# दोन परीक्षक



पगडी घरींच विसरून शास्त्रीबुवा रस्त्यानें धावत निघाले शेवड्याच्या बोळाजवळ त्यांची चिंतोपताशी टक्कर झाली. कारण चिंतोपंत समोरून आपला रुमाल काखोटीस मारून धूम पळत येत होते! टोकाला भक्कम गाठ मारलेली भरघोस शेंडी केळीच्या लोंगरासारखी वाऱ्यानें लुटुलुटु हालत असलेली, धावण्याच्या हिसक्यामुळें डोळ्यावरची आरशी नाकाच्या टोकावर पडलेली, कोटाच्या गुंड्या सुटलेल्या, उपरण्याचा सोगा लांब सुटून रस्ता झाडीत असलेला आणि सगळ्यांत भर म्हणजे सूर्यनमस्कार घालताना वर खोचलेलें धोतर तसेंच राहिलेलें, असा चिंतोपताचा विचित्र थाट पाहून रस्त्यावरचीं पोरेंच काय, पण नवथर मुलीही हसू लागल्या. बोळाच्या तोंडाशीं जेव्हां दोघाची साठमारी झाली, तेव्हा एक दुसऱ्याचे जणू काय प्रतिबिंबच आहे इतकें दोघाच्या अवस्थेत साम्य होतें.

"अर्रर्रर्र! हो, हो, कोण, शास्त्रीबुवा?" चिंतोपत उपरणें झटकीत उद्गारले

"कोण चिंतोपत? अरे, मी तुमच्याकडेच निघालों होतों." शास्त्रीबुवा आपला आनंदोत्साह दाबीत म्हणाले, "तुम्हांला एक आनदाची बातमी द्यायची होती."

"कोणती?"

इकडे तिकडे चोरट्या नजरेनें पाहात शास्त्रीबुवा कुजबुजले, "लखोटा आला!"

"मलाही आलाय्!" चिंतोपंतांनीं प्रतिध्वनि काढला.

"असं का ! मग जरा असे एका बाजूला या." शास्त्रीबुवा दक्षतेनें काळजी घेऊं लागले. तोंच चिंतोपत ओरडले, "हें काय शास्त्रीबुवा, तुमची पगडी ?"

"आं ?" करून शास्त्रीबुवांनीं डोक्यावरून हात फिरवला, तों खरेंच. वरचा असोल्या नारळ आणि त्याच्या एका टोकाला असलेला शेंडीचा खुट ह्याशिवाय हाताला कांहींच लागेना. "खरच की !" ते घाबरून म्हणाले, "बाहेर निघण्याच्या घाईंत शिरस्त्राण विसरलों अजिबात. नि तुम्ही कां रे बुवा असे ? ओंकारेश्वरला आलांत कीं काय पोचवून कुणाला ?"

"छे हो. धावतांना रुमाल हातांत आला आणि मग विचार केला, आपल डोक म्हणजे एक यत्र आहे, यत्र ! ती का रुमाल अडकवायची खुटी आहे ?"

"मग आतां अस करू. घरींच जाऊ म्हणजे मनमोकळेपणानें बोलतां येईल." शास्त्रीबुवांनीं सूचना केली.

वाचकहो, ह्या दोन प्राध्यापकांची ती धावपळ कोणत्या आनदामुळें होती हे आपण आता ओळखलेंच आहे. येईल, येईल म्हणून वाट पाहात आज कैक वर्षे परीक्षांची पर्वणी दोघाच्याही डोक्यावरून तशीच गेली. आजपर्यंत त्यांच्यापैकीं कोणाचेही हात परीक्षेनें ओले झाले नव्हते. दर वर्षी नेमणुकीकरितां अर्ज करायचा आणि आपल्या कुडलीवर हवाला ठेवून स्वस्थ राहायचें असा शास्त्रीबुवांचा शिरस्ता होता. शेवटीं आज तो सोन्याचा दिवस उगवला. बी. ए ला मराठीकरितां त्याना परीक्षक नेमण्यांत आल्याबद्दल युनिव्हर्सिटीचीं पत्रें दोघाच्या हातांत एकदम पडलीं! आणि त्यानतर वर लिहिल्याप्रमाणें त्याची धावपळ सुरू झाली

घरीं गेल्यावर 'तिनें' केलेल्या मसाल्याच्या दुधाचे घुटके घेत शास्त्रीबुवा गभीर चेहेऱ्यानें म्हणाले, "काय चिंतोपत, प्रश्नपत्रिका पाठवायला मुदत किती ?"

"चांगला महिना आहे की !"

"असं का? पुष्कळ आहे मग. तवर अभ्यासक्रम काय आहे तें पाहातां येईल !"

"मी म्हणतों पेपर काढून टाकावा. वेळ आली, म्हणजे दुरुस्ती करून सावकाश पाठवून देतां येईल." चिंतोपतांनीं सल्ला दिला.

"हे: ! इतकी घाई कशाला ?" शास्त्रीबुवा दुधाचा घोट घेत म्हणाले, "पेपर काढायला कितीसा उशीर ? दोन तासांचं काम. परंतु तें व्यवस्थित झाल पाहिजे ना ? कुणीं प्र काढतां कामाचा नाहीं. लखोट्यांत नियमपत्रिका आली आहे ती वाचून काढा. शिवाय मागील कांहीं वर्षांचे पेपर पाहा. त्याचप्रमाणें, येत्या बी. ए.च्या

परीक्षेला अभ्यासक्रम कोणता नेमून दिला आहे, त्याचा बिनचूक आढावा काढा म्हणजे पेपर काढण मुळींच कठीण जाणार नाहीं."

"पण माझ्याजवळ, हीं मुल शिकतात तीं पुस्तक कुठें आहेत? लायब्ररीच्या पुस्तकांवरच भागवतों मी आपल काम. पेपर काढायचा म्हणजे पुस्तकं हवींत."

"हां! ही एक अडचण आहे खरी कारण आमच्यापाशींही पुस्तकांचा नन्नाच हो, आम्हाला येते आहे कशाला पुस्तकं वापरायची वेळ?" शास्त्रीबुवांनीं सूर काढला

"बाकी आता हे परीक्षेचे पैसे येतीलच. तेव्हां पुस्तक खरेदी करायची तशी कांहीं........"

"छे छे छे, चिंतोपत अहो, करायचीं काय विकत घेऊन? त्या वर्षाचं पुस्तक शिंच नाहीं चालत पुढच्या वर्षाला! अस करू, उसनीं घेऊं या कुणाचीं तरी."

"आपल्याला नाही बुवा कुणी काहीं उसन देणार" चिंतोपंत खरें तेंच बोलले पण लगेच सावरून म्हणाले, "हो, आणि आम्ही तोंड वेगाडणारही नाहीं म्हणा कुणाजवळ."

"हरकत नाहीं. मी करतों त्याची व्यवस्था. पण मग एक काम तुम्हीं केलं पाहिजे मी पुस्तक तुमच्याकडे पाठवतों. तुम्हीं अभ्यासक्रमाप्रमाणें त्यांतले विषय वाचायचे आणि जेवढ्या भागांतून प्रश्न काढायचे त्यांवर तांबड्या पेन्सिलीनें खुणा करून ठेवायच्या. काय? समजल?"

"बर आहे" चिंतोपत शास्त्रीबुवाचा डाव चांगला 'समजून' म्हणाले.

"पण हें पाहा चितोपत, कुणाजवळ चकार शब्द नाहीं हां!" शास्त्रीबुवांनीं इषारा दिला.

"तें नको सागायला." चिंतोपत म्हणाले आणि रुमाल बांधू लागले.

महिना हां हां म्हणतां संपला तरी चिंतोपंतांच्या पेपरला ठिकाण नाहीं! शास्त्रीबुवांनीं कबूल केल्याप्रमाणें पुस्तकें एका ओळखीच्या ठिकाणाकडून आणवलीं आणि चिंतोपंतांकडे केव्हांच पोचवलीं होतीं शास्त्रीबुवांना मुली दोन. पैकीं थोरली लग्न होऊन सासरीं नांदायला गेली होती. धाकटी गंगू आतां लग्नाची झाल्यामुळें वर्षांतून सहा महिने वरसंशोधनापायीं शास्त्रीबुवांना खर्चीं घालावे लागत. पुस्तकांचें काम गंगूनेंच केलें होतें. ती अद्याप हायस्कुलांत पाचव्या इयत्तेच्या वाऱ्या करीत असली, तरी तिची एक मैत्रीण सरल एव्हांना बी. ए. पर्यंत पुढें गेली होती. अर्थात्

वडिलांनीं पुस्तकांची गोष्ट काढतांच आपल्या सरलच्या जिवावर गंगूनें तें काम पत्करलें आणि त्याप्रमाणें जरूर तीं पुस्तकें तिच्याकडून आणून शास्त्रीबुवाना दिलींदेखील. गंगूकरितां स्थळें पाहाता पाहातां शास्त्रीबुवांचा महिना केव्हाच गेला गोत्र, टिपणें, एकनाड, खडाष्टकें वगैरे भानगडींतून त्याना पेपरची आठवण कोठून होणार ?

परंतु एक दिवस गगू म्हणाली, "काका, पुस्तक परत करायची आहेत माझ्या मैत्रिणीचीं ती रोज मागते, पण मला किनई आठवण होत नाहीं सांगायची"

शास्त्रीबुवा दचकले ! घाईघाईनें ते उठले आणि युनिव्हर्सिटीचा लखोटा काढून त्यांत पेपर पाठविण्याची शेवटची तारीख पाहू लागले ती दृष्टीला पडताच त्यांचे डोळे फाकले आणि त्या कागदाकडे आ वासून पाहात ते उद्गारले, "बाप रे ! उद्याचा शेवटचा दिवस. अरे माझ्या कर्मा !" लखोटा मुठींत गच्च पकडून स्वारी मटकन् खाली बसली ! इतके दिवस बेफिकीरीनें घालवण्याइतके आपण शख कसे बनलों, एवढें भान आपल्याला कसें राहिले नाही असे पश्चात्तापाचे विचार त्याच्या डोक्यांत येऊं लागले. परंतु आता पश्चात्ताप करून काय उपयोग ? काहीं तरी धडपड करून पेपर वेळेवर रवाना करायला हवा. नाहीं तर फजितीला पारावार नव्हता

"आणि तो चिंतोपत ! पुस्तक घेऊन बसला तो पुन्हा तोंड दाखवायला आला नाहीं. कसलीं माणस हीं ?" शास्त्रीबुवा गर्जू लागले आणि गगूला म्हणाले, "थाब हं मगे, असाच जातों मी ! पेपर काढतोय् आपल्या डोंबलाचा !"

पुन्हा टक्कर ! आणि तीही शेवड्याच्या बोळान्या तोंडाशींच ! फरक इतकाच, कीं आज शास्त्रीबुवा दुर्वासाच्या आवेशांत होते टक्कर होतांच त्यानी हातातला सोटा उगारला आणि ते ओरडले,

"अरे चिंत्या, दीडशहाण्या डोळे फुटले काय तुझे ?"

स्थानभ्रष्ट झालेला रुमाल पुन्हा डोक्यावर ठेवून आपला बचाव करीत चिंतोपत आर्जवूं लागले, "माफ करा. शास्त्रीबुवा, चूक झाली खरी. पुस्तक परत घेऊन हा तुमच्याकडेच निघालों होतों"

"माफ करा काय ? माझ्या अब्रूला काळोखी फासायची वेळ आणलीस तू आज. अरे मूर्खा, आज शेवटची तारीख"

"आज नाहीं काका, उद्यां."

"समजल हो अकलेचे खदक ! पेपरचा नाहीं अजून पत्ता. टपालाची वेळ गेलेली कि उद्या तुझा पेपर तिथें कोण नेऊन घालील, काकोबा ?"

" त्याचं असं झालं काका, दापोलीहून पत्र आल आमची 'ही' प्रसूत होऊन पुत्ररत्न झाल म्हणून गेलों. बारशापर्यंत राहा म्हणून सासुरवाडचा आग्रह! करतां काय ? राहिलों झाल!"

" हाय रे दुर्दैवा, राजीनामा द्यावा मला वाटतं आतां "

" छे! सबड मिळावी म्हणून रजिस्ट्रारसाहेबांना तारेनें विनंती करून पाहूं."

" अरे, पण पुस्तक तर आज परत दिलींच पाहिजेत पुस्तक गेल्यावर पेपर कशांतून काढणार, आपल्या डोंबलातून ?

" अः! पुस्तकांची अडचण नाही आता प्रश्न काढायच्या भागावर खुणा करून चक्क नंबर देखील घालून ठेवले आहेत मी प्रवासातला वेळ कांहीं अगदींच फुकट नाहीं दवडला. पेपर काय, आत्तां लिहून काढू "

ह्या बातमीने शास्त्रीबुवाना जरा हायसें वाटले. अधिक तक्रार न करतां ते चिंतोपताना आपल्या घरी घेऊन गेले चिंतोपतानीं लगेच रजिस्ट्रारसाहेबांना तार ठोकली, " पेपरला उशीर बायको बाळंत विनंती चार दिवसाची सवड."

रजिस्ट्रारसाहेबांचा जबाब आला, "विनंती नामंजूर पेपर उद्यां दाखल करा. नाहींपेक्षा दुसरे परीक्षक " झालें! ह्या उत्तरानें शास्त्रीबुवांची कंबरच खचली! चिंतोपतानीं खुणा केलेले भाग वाचून काढण्यासदेखील आतां फुरसत नव्हती. एक कोरा कागद घेऊन उभयतानीं त्या खुणाप्रमाणे प्रश्न काढण्यास आरंभ केला. पेपर एकदाचा तयार झाल्यावर पतानीं कल्पना काढली, कीं रात्रीच्या गाडीनें मुंबईस जाण्याकरिता निघावें म्हणजे दुसऱ्या दिवशीं अकरा वाजतां पेपर खुद्द रजिस्ट्रारसाहेबांच्या हातांत देता येईल. खर्चाची असली तरी ह्या आणीबाणीच्या वेळीं अब्रू वांचवण्यास उपयोगी, ह्या दृष्टीनें ती कल्पना शास्त्रीबुवाना पसंत पडली. प्रश्नाची निवड झालेली असल्यामुळें उसनीं पुस्तके परत करण्यासाठीं शास्त्रीबुवांनीं गगूजवळ दिलीं

काढलेल्या पेपरांत शुद्ध-अशुद्ध वगैरे तपासून दुरुस्त केल्यामुळें इतकी खोडाखोड झाली, कीं पुन्हा दुसऱ्या कागदावर तो लिहून काढावा लागला. नंतर तो बारकाईनें चार वेळां वाचून समाधान झाल्यावर त्याची घडी करण्यांत आली. पतांनीं बाजारांतून मुद्दाम इन्शुरन्सचें कापडी पाकीट आणलें आणि त्यात ती मौल्यवान् चीज घालून तें डकविलें. वर लाखेचीं सिलें उठविल्यावर हळदकुंकू टाकून शास्त्रीबुवांनीं तें पाकीट आपल्या हडप्याच्या चोरकप्प्यांत ठेवून दिले. कच्चा पेपर

जाळण्यांत येऊन त्याची राख पुरून टाकण्यांत आली! नंतर रात्रींच्या प्रवासाची तयारी करण्याकरितां पंत घाईघाईनें निघून गेले

जातांना त्याना शास्त्रीबुवांनीं बजावलें, "वेळच्या वेळेवर या ह स्टेशनवर! नाहीं तर पुन्हा सासुरवाडच पत्र येईल नि पळाल कोकणांत. तुम्हीं आलां नाहीं तर मी कांहीं थाबणार नाहीं!"

शास्त्रीबुवानीं विचार केला, एवींतेवीं मुबईचा प्रवासखर्च करणें आलेंच मग त्यांतल्या त्यांत आपलें काम का न उरकून घ्या? वरसशोधन फायलींतला पत्रव्यवहार चाळण्यास त्यांनीं सुरुवात केली मुबईच्या आसपासचीं स्थळें होतीं, त्यांचे पत्ते व जरूर ती माहिती टिपून घेतली नाहीं नाहीं म्हणता दहा अकरा अशीं निघालीं, कीं त्यांच्याकडे मुलगी पाहाण्यापर्यंत बोलणें झालें होतें अर्थात गगूला बरोबर घेऊन जावें म्हणजे अनायासेंच राहिलेलें काम होऊन जाईल असा युक्तिवाद शास्त्रीबुवांनीं लढवला. त्याप्रमाणें गगूची तयारी करण्याबद्दल हुकूम सुटला आणि गंगूकरितां फॅशनेबल कपडे थोड्या खर्चांत कसे व कोठें मिळतील ह्या विवंचनेंत स्वारी बाजाराकडे निघाली. कारण मुंबईकडे मुलगी दाखवायची म्हणजे तिची सजावट 'अप्-टु-डेट' करायला हवी ना!

रात्रीं साडेनवाच्या सुमाराला ही प्रोफेसराची जोडगोळी, गगू व इतर बोजांसहित प्लॅटफॉर्मवर पॅसेंजरची वाट पाहात बसलेली आढळली. जणू काय आता गंगू परीक्षेच्या मडपांतच जात आहे अशा घाईनें शास्त्रीबुवा गगूला वधूपरीक्षा पसार होण्याकरितां लागणाऱ्या ताज्या 'टिप्स' देण्यात गर्क झाले होते अशा टिप्स त्यानीं गंगूला आजवर इतक्या दिल्या होत्या, कीं त्यांचा सग्रह छापला असता तर हजार पानाचा एक जगी 'वधूपरीक्षाविज्ञानकोश' तयार झाला असता. "लग्नमंडपांतील वधूची कामगिरी" आणि "प्रपंचांतील पहिलें पाऊल" ह्या दोन ग्रंथांचें साहित्यही शास्त्रीबुवांजवळ तुडुब होतें परंतु गगूच्या हातांत हे ग्रंथ देण्यापर्यंत अद्याप कोणत्याच स्थळाकडे मजल गेली नव्हती आपल्या ताज्या टिप्स गंगू मोठ्या हौसेनें ऐकत असावी असा शास्त्रीबुवांचा समज असला पाहिजे. पण बिचारी गंगू त्यांच्या प्रत्येक 'समजलीस का?' पालुपदाला 'हो हो' करतां करता रडकुंडीला आली होती आणि आपण ह्या साडेसातींतून कधीं एकदा सुटतों असें तिला होऊन गेलें!

साडेदहा बाजण्याच्या सुमाराला प्लॅटफॉर्मवरील मंडळीचें लक्ष एकाएकीं जिन्याकडे

खेचलें गेलें. तसा विशेष प्रसंग कोणचाही नव्हता एका हातांत हॅंडबॅग आणि दुसऱ्या हातात टुमदार छत्री घेतलेली एक तारका लचकत ठुमकत जिन्याच्या पायऱ्या उतरून येत होती अठरा वर्षांची गोरीपान मुलगी, पाठीमागें सोडलेली सळसळ करणारी लांबलचक वेणी, मोहक चेहेरा, गोडशी जिवणी आणि गुलाबी खळीदार गालांचे टवटवीत गेंद मानेला चवळीसारखी लचक आणि शरीराची प्रमाणबद्ध ठेवण इतक्या गोष्टींचा मिलाफ पाहाण्याकरिता रुळावरील काळ्या कुट्ट एजिनानें देखील जिन्याकडे तोंड फिरवलें असतें, मग उतारूचीं काय कथा ? बिनबाहीच्या ब्लाऊजमुळें खांद्यापासून उघडा दिसणारा तिचा हात हॅंडबॅगच्या हिसक्यामुळें एखाद्या रेशमाच्या पेळूप्रमाणें लवलव करीत होता. कित्येकाचें लक्ष तर त्या गोंडस हातावरच खिळून राहिलें होतें

खालीं घसरू पाहाणाऱ्या लांब सडक पदराला वरच्यावर खेळवीत ती सौंदर्यकळी जेव्हां शास्त्रीबुवाऱ्या समोर येऊन उभी राहिली, तेव्हां तबाकूचा बार भरण्यासाठीं शास्त्रीबुवांनी पसरलेला ‘ आ ’ तसाच उघडा राहिला चिंतोपंतांना एक कोपरखळी मारून त्यानीं समोर अवतरलेलें देवलोकींचें सौंदर्य पाहून डोळ्यांचें पारणें फेडून घेण्याविषयीं सूचना दिली ‘ केसरी ’ वाचनात दंग झालेल्या पंतांनीं आपल्या चष्म्याच्या भिंगावरून त्या चित्राकडे पाहिलें मात्र ! त्याचीही अवस्था तत्काळ शास्त्रीबुवांसारखी होऊन बिचारा ‘ केसरी ’ त्यांच्या केव्हां पायदळीं पडला तें त्याना समजलेंदेखील नाहीं सूर्योदय होतांच विजेची बत्ती एखाद्या मेणबत्तीसारखी वाटावी, तशी शास्त्रीबुवाची ‘ हजारांतली एक गंगू ’ खरोखरीच हजारांतली एक, पण उलट अर्थानें वाटू लागली ! शास्त्रीबुवांना तर त्या दोन चित्रांमधला फरक पाहून धसकाच बसला ! त्यांची टकळी एकाएकीं बंद कां पडली म्हणून गगूनें जेव्हां वर पाहिलें, तेव्हां तिचें लक्ष प्लॅटफॉर्मवर उगवलेल्या त्या पौर्णिमेच्या चंद्रबिंबाकडे गेलें.

“ अय्या ! सरल इकडे कुणीकडे ? ” असें मोठ्यानें म्हणून ती आपल्या मैत्रिणीला भेटायला धावली.

“ मुबईला जातेंयू दादाकडे. ” जणूं काय पैंजणांचा गोड झंकार ऐकू आला.

“ आणि परीक्षा ? ”

“ तिकडेच बसणार आहें. मुंबई सेंटर घेतला आहे. ”

“ अभ्यास काय म्हणतोयू ? ”

" बरा आहे. "

" तुम्ही काय बुवा, स्कॉलर ! पहिल्या येणार हें ठरलेलच. " गगू म्हणाली आणि मग एकाएकीं आठवण होऊन तिनें आपल्या मैत्रिणीचा शास्त्रीबुवांना परिचय करून दिला.

" अहो काका, ही पाहिलीत का सरल गोडबोले ? नांवाप्रमाणेंच अगदीं मजुळ आणि मिष्ठास बोलते. बी. ए ला बसणार आहे यदा. "

" होय का ? " शास्त्रीबुवानीं एखादें सुदर कलापूर्ण चित्र न्याहाळावें त्याप्रमाणें सरलकडे आपादमस्तक पाहून विचारलें. जसें काहीं आतांपर्यंत त्यांचे लक्ष तिच्याकडे गेलेंच नव्हते ! गगूनें चिंतोपतानाही सरलचा रीतसर परिचय करून दिला, तेव्हां त्याची कोण धांदल ! केसरी गुडाळून ते वरिष्ठ अमलदाराला सलामी द्यावी, त्याप्रमाणें आपले पटकन् उभे राहिले ! सरलकडे एकदा फिरवलेली नजर त्यांना हालवता येईना

" कोणत्या कॉलेजात आहात तुम्ही ? " शास्त्रीबुवांनी संभाषणाचा मोका साधला.

" फर्ग्युसनमध्यें. " तिनें हलक्या हातांनीं आपल्या ओठांवरून रुमाल फिरवीत म्हटलें.

" अस्स ? ऑनर्सला बसणार कीं..."

" हो. मराठी ऑनर्स "

" हू ? " शास्त्रीबुवा चिंतोपतांकडे एक चोरटा दृष्टिक्षेप करून उद्गारले.

" हिचींच पुस्तक मीं आणून दिलीं होतीं काका तुम्हांला. " गगूनें आपल्या वडिलांना एकीकडे बातमी दिली.

" कुठें उतरणार तुम्ही ? " सरलनें प्रश्न केला.

" काय की ! " गगू उत्तरली.

" तुम्ही आमच्या दादाकडे चला ना ग. " सरलनें आग्रह केला.

" काका, ही पाहिल का काय म्हणतेय् ? "

" काय ? "

" म्हटलं, आमच्या दादाकडे चलाव. चार दिवस आमचा पाहुणचार घ्यावा आणि काम झाल्यावर यावं परत आमच्या दादाला फार आनंद होईल तुम्ही आलांत तर. "

" —— असतों आनदानं हो. आमच्या गगूलाही एकटं वाटलं नसतं. पण

आमचे पत सोडतील तेव्हां ना ! " शास्त्रीबुवांनीं सरळ गप्प ठोकली.

" म्हणजे ? शास्त्रीबुवा माझी काहीच..." चितोपत चाचरू लागले.

" तेंच सांगतोंय् ह्यांना " शास्त्रीबुवा त्याचें वाक्य पुरें होऊ न देतां म्हणाले, " तुमची-आमची मैत्री म्हटली म्हणजे आज चाळीस वर्षांची. तेव्हां तुमचा शब्द कसा मोडवेल आमच्यानें ? "

" काका..... "

गगूही बुचकळ्यात पडून विचारू लागली

" अग, चिंतोपताच्या काकूनीं तुला आंगाखाद्यावर खेळवलेल; तुझीं दुपटीं धुतां धुतां बिचाऱ्यांच्या हातांना घट्टे पडत किती दिवसांत भेटली नाहींस बरं तू त्यांना !"

शास्त्रीबुवांनीं तिला बोलू न देता आपलीच टकळी चालू ठेवली.

सरल तर गागरलीच. पण शास्त्रीबुवाना झालें आहे तरी काय ह्याचा गगूलादेखील उलगडा होईना पत वेड्यासारखे त्याच्या तोंडाकडे पाहू लागले. बिचारी सरल एवढ्या अगत्यानें बोलावते आहे आणि हे आपल्या नावावर तिला थापा काय देतात ? आहे तरी काय हें गौडबगाल ?

परंतु त्यांना फार वेळ बुचकळ्यात राहावें लागलें नाहीं, कारण गाडी स्टेशनांत आली. जो तो आपल्या धादलीत गर्क झाला सरल गोडबोले एका सेकंड क्लासच्या डब्यांत जाऊन बसली. शास्त्रीबुवानी पिछाडीचा एक बिनगर्दीचा डबा हुडकून काढला आणि तेथें आपली पथारी सोडली. मघांच्या विचित्र वर्तनाचा आता ते खुलासा करतील म्हणून चिंतोपत आतुरतेनें वाट पाहात होते. पथारी सोडल्यावर शास्त्रीबुवानीं पाण्याचें भांडें तोंडाला लावले आणि एका दमांत रिकामें केलें. नतर उपरणें सोडून डोक्याला गुडाळलें आणि " कराग्रे वसते लक्ष्मी करमध्ये सरस्वति " वगैरे चरण पुटपुटत स्वारी आडवी झाली.

" अरे चिंतोपत, इतके कसे रे तुम्ही अजागळ ? "

" कबूल. " पत म्हणाले.

" अहो, आपण गगूला कशाला बरोबर नेत आहोंत ? दाखवायला. खरं ना ? मग तुम्हींच सांगा, तिला पाहायला येणाऱ्या वरपक्षाच्या मडळीसमोर ही सरल गोडबोले चहा घेऊन आली म्हणजे आमच्या गगूकडे कुणी ढुकून तरी पाहील का ? काय ? मी म्हणतों तें आल का लक्षांत ? "

आतां मात्र पताच्या डोक्यांत लख्ख प्रकाश पडला. मुलीचा बाप आपल्या

कामांत कसा तरबेज असावा लागतो आणि त्यानें किती धोरणें सांभाळावीं लागतात हें पंतांना समजलें सरल पुढें दिसल्यावर गगूच्या मार्कांची बेरीज आवळ्याएवढी होणार हा शास्त्रीबुवाचा पॉइंट महत्त्वाचा होता खराच !

खिडकींतून येणाऱ्या वाऱ्याच्या झुळकेनें तिघांनाही डुलक्या येऊ लागल्या. गगूला एका कोपऱ्यांत पथारी पसरून देण्यांत आली. चिंतोपतही आपल्या गाठोड्यावर रेलून निवांतपणें घोरू लागले. डब्यांतले इतर चारदोन उतारूही लवकरच झोपीं गेले. अशा रीतीनें गाडी तळेगावच्या पुढें गेली असेल नसेल, तोंच शास्त्रीबुवा एकदम दचकून जागे झाले ! त्यानीं पतांनाही गदगदा हलवलें. पंत घाबरून ओरडणार, इतक्यांत त्याच्या तोंडावर सराईत दरोडेखोराप्रमाणें हात दाबून शास्त्रीबुवांनीं दटावलें, " चूप राहा, ओरडूं नका. "

" क.. क...कां ? " पतांची बोबडी वळली. आपल्याला कांहीं तरी भयकर स्वप्नच पडत असावें असा त्यांना भास झाला हा रामोशी आपलें आतां काय करणार आहे, त्याची त्यांना काहीच कल्पना येईना.

" कां काय ? " शास्त्रीबुवा गभीर चेहेरा करून म्हणाले, " तो पेपर ? "

" आं ? काय झालं पेपराला ? कुणीं खिसा कापला बिपला कीं काय ? "

" पेपर आहे पण त्याचा आतां काहीं उपयोग नाहीं "

" उपयोग नाहीं ? "

" छे छे चिंतोपत, अक्कल पुण्याला ठेवून निघालांत तुम्ही अहो सद्‌गृहस्थ, ती पोरगी मघाशीं भेटली, तिचीं पुस्तकं आपण घेतलीं होतीं ना ? "

" बरं मग ? " अजून पताच्या डोळ्यासमोरचें धुकें वितळलें नव्हतें.

" मग काय ? तिच्या पुस्तकांतून खुणा आहेत ना प्रश्नांच्या ? चांगल्या तांबड्या पेन्सिलीनें करून ठेवल्या होत्यात की ? "

चिंतोपत एकदम उठून बसले. ही भयकर गोष्ट ह्या वेळपर्यंत त्यांच्या लक्षांत आली नव्हती. सरल गोडबोले परीक्षेला चाललेली. तिच्या पुस्तकात पेपरांतले प्रश्न अधोरेखित केलेले. पुण्याहून तीं पुस्तकें आतां मुंबईला जाणार. खासा हिशेब ! पेपरचें फिरतें प्रदर्शनच निघालें होतें तें ! एवढ्या श्रमानें पेपर काढून तो फुटलाच शेवटीं ! हे सारे विचार पंताच्या " बटाट्याच्या गाळ्यांत " [ त्यांच्या डोक्याला शास्त्रीबुवांनीं ठेवलेलें आवडतें नांव ] भराभर येऊन गेले.

शास्त्रीबुवा डोळे मिटून ध्यानस्थ बसले होते. बराच वेळ गेला तरी ते कांहीं

बोलले नाहींत. गाडी जेव्हां एका स्टेशनवर उभी राहिली, तेव्हा " आतां पाणी पिऊन येतों हां " असें सागून स्वारी डब्याच्या बाहेर पडली. पत जागच्या जागीं थिजून गेले होते. आपण करायला गेलों काय आणि झालें काय ? सगळेंच ओंफस्! त्यापेक्षां नसती ही परीक्षेची घोरपड गळ्यात घेतली तरी बरें होतें आणि त्यांत पुन्हा असंगाशीं संग आणि प्राणांशीं गाठ!

आता गाडी हलणार इतक्यांत शास्त्रीबुवा बाहेरच्या अधारातून पटकन् डब्यांत शिरले आणि चारी दिशांना चोरट्या नजरेनें पाहून ते पतांना हळूच म्हणाले,

" काम फत्ते, चिंतोपत! "

" कसल काम ? " त्या गूढ शब्दांचा आशय ध्यानांत न आल्यामुळें पंतांनीं विचारलें.

" पेपर पुन्हा काढायला नको असा बदोबस्त करून टाकला. " पुन्हा कावऱ्याबावऱ्या नजरेनें चहूकडे पाहात शास्त्रीबुवांनीं खुलासा केला

" म्हणजे ? तो कसा ?"

" बसा सागतों सगळ " गाडीनें स्टेशन मागें टाकतांच सुटकेचा एक लांब निःश्वास सोडून शास्त्रीबुवा म्हणाले आणि त्यांनीं बाकावर ऐसपैस बैठक मारली! उपरण्याखालून कांहीं तरी जाडजूड जिन्नस त्यानीं प्लॅटफॉर्मवरून आणला होता तो मात्र तसाच दडवून ठेवला. नतर डोक्यावर बोटे ठोकीत ते म्हणाले, " उगीच नाहीं डोकं. आज मी होतों म्हणून प्रसंग निभावला आतां पेपर फुटायची धास्ती नको. "

" आपल्या नाहीं बुवा अजून लक्षांत येत शास्त्रीबुवा! " पतांनीं कबुली दिली.

" अरे, हें पाहिलत का ? " उपरण्याखालीं दडवून ठेवलेलीं पुस्तकें बाहेर काढून शास्त्रीबुवा म्हणतात, " पुस्तकच आणली उचलून तिचीं! "

चिंतोपत थड झाले! कपाळावरील घाम पुशीत ते शास्त्रीबुवांच्या तोंडाकडे वेड्यासारखे पाहू लागले.

" ही विद्या केव्हा शिकलांत शास्त्रीबुवा ?" त्यांनीं घाबऱ्या स्वरांत विचारलें.

" कॉलेजांत चार वर्षं उगीच नाही काढलीं! " शास्त्रीबुवांनीं फुशारकी मारली.

"मुलींच्या बाकांवरची पुस्तक हातोहात लांबवण्यांत माझा हातखडा असायचा!"

" राम कृष्ण हरि! " करून पतानीं कपाळावर हात मारून घेतला!

डब्यांतले इतर उतारू ही कुजबूज ऐकून हळूहळू जागे व्हायला लागले होते. बहुतेक जण मडईवालेच होते " हीं बामनं करत्यात तरी काय कवाधरनं ? " हें

त्यांच्या ध्यानांत येईना. आपली झोपमोड केल्याबद्दल जरी ते चांगलेच गरम झालेले असले, तरी ह्याबद्दल उघड तक्रार करण्याची कोणाची तयारी दिसली नाहीं. किलकिले डोळे करून ते बिचारे ह्या दोन बामनाकडे शून्य दृष्टीनें पाहात होते. बाराबंदीच्या खिशातून शास्त्रीबुवांनीं एक विडीचें थोटुक काढलें आणि तें पेटवून लवकरच त्यांनीं सारा डबा धुरानें भरून टाकला. आज आपण केवढी नेपोलियनगिरी केली अशा ऐटीनें स्वारीनें आपल्या पथारीवर ऐसपैस हातपाय पसरले

एवढ्या धाडसानें डल्ला मारून आणलेलीं पुस्तकें पतानीं सहज हातांत घेऊन चाळून पाहिलीं पण एक एक पुस्तक पाहून होताच त्यांच्या हाताला कंप सुटत चालला शेवटचे पुस्तक पाहून झाल्यावर ते ओरडले,

" घात.! घात झाला शास्त्रीबुवा ! "

" आतां उगीच कोकलू नका. कशाचा आलाय् घात ? "

" अहो महाराज, ह्याच्यात मराठीचीं पुस्तक नाहीत "

" छे छे, असं कसं होईल ?" शास्त्रीबुवा पटकन् उठून म्हणाले, " नीट पाहा, भ्रम झाला असेल तुम्हांला ! "

" भ्रम कसला आला आहे ? ह्यांत एक मराठीच पुस्तक असेल तर शपथ "

शास्त्रीबुवांच्या तोंडांतलें विडीचे थोटुक तत्क्षणी गळून खाली पडलें ! स्वारी पटकन् बाकावर बसली आणि डोके हातांत धरून म्हणाली, " घात झाला खरा. आतां काय करणार ? पोरीनें चांगली जिरवली ! "

" आता शख करणार " चिंतोपत [illegible] मोठेपणा घेऊन म्हणाले, " मला विचारलं असतत तर असा फजितवाडा होता ना ! पण तुम्ही पडलात अहमन्य ! अगोदर तीं पुस्तक ...तो चोरांचा माल लपवा पाहू !"

" अः ! तें काहीं मोठस कठीण नाहीं." असे म्हणून शास्त्रीबुवांनीं तीं सारीं पुस्तकें आपल्या आंगरख्याच्या आंतील बाजूला चोरकप्प्यांत ठेवून दिलीं.

" आता तें पाकीट काढा. "

शास्त्रीबुवांनीं पेपरचें सीलबद पाकीट काढलें पतांनीं तें मुकाट्यानें घेतलें आणि काडी लावून पेटवलें संपूर्ण जळाल्यानतर त्याची राख कपाळाला लावून ते म्हणतात,
" भग्नपत्रिका भस्मीकृता ! "

थोडीशी राख आपल्याही कपाळाला लावून शास्त्रीबुवा म्हणाले " ह ! चला, संपला कारभार आपल्या नशिबींच नव्हता हा परीक्षेचा लग्गा. म्हणतात ना, देव

देतो नि कर्म नेत !"

" निराश व्हायच कांही कारण नाहीं." आपल्या डोक्यावर टिचक्या मारीत पतांनीं धीर दिला, " हा कांहीं अगदींच सुरणाचा कांदा नाहीं, यत्र आहे यत्र ! त्याचं सामर्थ्य पाहा आतां."

" दिसू द्या कीं ते एकदा !"

" ऑल राइट. दुसरा पेपर काढा आत्ताच्या आत्ता."

" ते बरोबर " शास्त्रीबुवानी हिणवलें, " चोऱ्या कशा कराव्या ह्यावर काढा पेपर ! नाहीं अभ्यासक्रम, नाहीत पुस्तक. नि पेपर कशाचा आपल्या डोचक्याचा काढता ?"

" नसलीं तर नसलीं पुस्तक सर्वसाधारण विषयावर प्रश्न काढू म्हणजे झाल !" पतांनी कागद काढून शास्त्रीबुवांना उत्तर दिलें, " ह, चला, या पाहू !"

ते दोन प्राध्यापक पुन्हा डोक्याला डोकें भिडवून डब्याच्या एका कोपऱ्यांत पेपर काढायला बमले ! त्यांची कुजबूज, नेत्रसकेत, विलक्षण हातवारे वगैरे प्रकार पाहून समोरच्या भेंडीवाल्याची चौकसबुद्धि जागृत झाली एकानें आपल्या शेजाऱ्याला हलवून हळूच विचारलें, " काय रं सोपान्या, बामन काय खलबतं करत्यात ?"

" म्यबर हायेत जनु कौनशिलाच " सोपान्यानें शका काढली.

" कशाच आल म्यबर ? आंकड लावत्यात काटणचे !" राघोबा म्हणाला.

" हीः ही· हीः !" सोपान्या हसला.

गाडीने कुर्ला स्टेशन सोडल्यावर पेपर एकदाचा तयार झाला. खालील दिव्य प्रश्नाचा त्यात समावेश होता .—

१ छदीफदी व अनतफदी ह्यांपैकीं अधिक श्रेष्ठ कवि कोण ? सटीप विवेचन करा.

२. छदोपनिषद् व मुक्तछंदाचा वाद ह्यातील छद कोणते ? आपणाला त्यापैकी कोणते छद आवडतात ? " सारे छद सोड !" हें कोणाला उद्देशून म्हटलें आहे ?

३. माझें रामायण व वाल्मीकि रामायण ह्यातील पात्राची तुलना करा. हनुमंत व सुग्रीव सोडून बाकीच्या वानराचा समाचार घ्यावयास नको.

४. ज्ञानेश्वरानीं ज्या रेड्याकडून वेद वदविले, तो कोणत्या जातीचा होता ? चित्रें काढून स्पष्टीकरण करा.

५. मराठी भाषेचा उगम व नर्मदा नदीचा उगम ह्यातील साम्य दाखवा. नर्मदेंतील गोटे आणि जर्मन कवि गटे ह्यांचें नातें काय ?

६. चंद्रशेखर कवीचीं सर्व विडंबनकाव्यें सटीप चर्चून काढा. तुम्हांला आवडणाऱ्या कोणत्याही एका कवीचें विडंबन करा. ( कवयित्रींना वगळावें. )

७. भावबंधन नाटकांतील मोरूचें माहात्म्य सांगा. ह्या पात्राच्या द्वारा नाटककारानें काय साधलें आहे ? गड आला पण सिंह गेला ह्यांतील वाङ्मयचौर्य शोधून काढा.

८. वरेरकरांना दाढी, मिशा व शेंडी असती तर ? ह्यावर एक प्रबंध लिहा.

शुद्धलेखन नपाणण्यासारिन्ां शास्त्रीबुवा बाकावर उभे राहिले पेपर दिव्यापुढें धरून त्यानीं तो बारकाईनें वाचावयास सुरुवात केली. इतक्यांत दिव्यापाशीं गु गुं करणारें एक पाखरूं शास्त्रीबुवांच्या भरघोस मिशाच्या जाळींत अडकलें व तडफडू लागलें त्याला मोकळें करण्यासाठीं त्यांनीं एका हातानें आपल्या मिशीची चवरी वर उचलायला आणि तितक्यांत वाऱ्याचा एक झोत खिडकींतून यायला एकच गांठ पडली पेपर शास्त्रीबुवाच्या हातून निसटला आणि हां हा म्हणता खिडकीबाहेर उडून गेला. चिंतोपंतांच्या हातवाऱ्याचा कांहीं उपयोग झाला नाही !

ह्या अकल्पित घटनेनें दोघेही क्षणभर दिङ्मूढ झाले. एवढ्या मेहनतीनें काढलेला पेपर हातचा गेला पंत शास्त्रीबुवांना दूषणें देऊ लागले उलट खिडकी उघडी ठेवल्याबद्दल शास्त्रीबुवा पंतावर घसरले. सोपान्या-राघोबाची तर हसतां हसतां मुरकुंडी वळली. "नुसते हातपाय गाळण्यापेक्षां साखळी ओढली असती तर ?" असें पुटपुटून शास्त्रीबुवा पुन्हा बाकावर चढले. आता हा वेदोमार्तंड आणखी आपत्ति ओढवून घेणार असें पाहून पंतांनीं पटकन् शास्त्रीबुवाच्या कमरेला विळखा घातला, त्यामुळें शास्त्रीबुवा सरळ खालीं कोसळले. शरीराबरोबर त्याच्या मनाचाही तोल सुटला पायतण काढून ते पंताच्या आंगावर धावले. त्यांना शांत करून पंत म्हणाले,

"वेड का लागलय् तुम्हांला शास्त्रीबुवा ?"

"म्हणजे ? धोक्याच्या साखळीचा उपयोग काय ?" शास्त्रीबुवा गरजले.

"उपयोग राहील बाजूला. उगीच पन्नास रुपयांना चाट बसेल. पेपर तर हातीं लागणार नाहींच, पण रेल्वेच्या लोकांना साखळी ओढण्याचं कारण पटणार नाहीं. त्यामुळें परीक्षेचा छदामही न मिळतां उलट वर दंड होऊन पन्नास रुपये खिशांतून जातील. आहांत कुठें ?" पंतांनीं खुलासा केला.

विचारान्तीं शास्त्रीबुवाना पंताचें म्हणणें पटलें. परंतु आतां पेपराचें काय करणार हा प्रश्नच होता. पंतांचें मत पडलें, आठवतील ते प्रश्न घालून झटपट दुसरा पेपर तयार करावा. परंतु शास्त्रीबुवांचें म्हणणें, कीं आतां तेच प्रश्न घातले तर पेपर

फुटल्यासारखेंच होईल. कारण अगोदर काढलेला पेपर रेल्वेद्वारां जाहीर झाला आहे. हो, रेल्वेरस्त्यावर तो कागद कोणाला तरी सापडणारच. शेवटीं हो ना करतां असें ठरलें, कीं माटुग्याला उतरून उडून गेलेला पेपर शोधायचा ! कल्पना पतांनीं काढली आणि शास्त्रीबुवांनीं तिला मान तुकविली !

माटुग्याला गगूसहित तीनही उतारू उतरले. पलीकडच्या एका डब्याशीं कांहीं तरी गोंधळ चाललेला दिसला पोलिस शिपाई वगैरे जमले होते आणि कोणी तरी बाई त्याच्याजवळ मोठ्यानें तक्रार करीत होती. परंतु तिकडे लक्ष द्यायला वेळ नव्हता. गाडी स्टेशनवर फार वेळ उभी राहिली नाहीं.

आपल्या सामानांतून कदील काढून तो पेटवल्यावर शास्त्रीबुवांनीं गंगूला स्टेशनवरच सामानाजवळ बसून राहाण्याबद्दल बजावलें आणि ते दोन वीर पहाटेपूर्वीच्या काळोखात पेपरसंशोधनाच्या मोहिमेवर रेल्वेलाइनच्या कडेनें निघाले. अंधारांत रुळांवरून सहीसलामत चालत जाणें किती कठीण असतें हे त्या गोष्टीचा ज्यांना अनुभव आलेला आहे तेच जाणोत त्यांतल्या त्यांत हे दोघे ह्या कामांत अगदींच नवखे ! तरीपण कदिलाच्या अंधुक उजेडांत, ठेंचाळत का होईना, दोघेजण कुत्र्यांच्या रोखानें रेल्वेलाइन धुडाळू लागले पतांनी उजवी बाजू व शास्त्रीबुवांनी डावी अशा रीतीनें पद्धतशीर संशोधन सुरू झालें. कोठलाही कागदाचा कपटा दिसला कीं उचल, कदिलाच्या उजेडात तो न्याहाळून पाहा, आणि पेपर नसल्यास तो टाकून दे असा कार्यक्रम चालला होता. उचललेल्या कागदात कित्येक वेळा अनंत प्रकार असायचे ! परंतु त्या वीराना त्याची तमा नव्हती आपलें संशोधनाचें कार्य त्यांनीं नेटानें चालविलें होते

आपल्या कार्यांत दंग असतां पॉवर हाउसनजीक पुलाखाली त्यांना एकदम "खडे रहो!" म्हणून कोणींतरी हटकलें. पाहातात तों पोलिस शास्त्रीबुवांच्या एकदा मनांत आलें, कीं तुरी द्यावी. परंतु आपण पळालों तरी पत ह्या कामात सरावलेले नसल्यामुळें पोलिसाच्या हातीं लागणारच आणि पोलिसांच्याजवळ कंदील असल्यामुळें तेही आपला कसोशीनें पाठलाग करणारच हें लक्षांत घेऊन तो विचार त्यांनीं सोडून दिला. हां हां म्हणता त्यांना पोलिसांनीं चहूकडून घेरलें. त्या पाहारेकऱ्यांत कोणी तरी मायाळू 'सखाराम' मिळेल म्हणून पंतांनीं आशाळभूतपणानें पाहिलें. परंतु सगळेच लेकाचे एकजात अक्राळविक्राळ दाढीमिशाबाज ! पंतांना ब्रह्मांड आठवलें. शास्त्रीबुवांचें अवसानही गळून गेलें.



" क्या करता है ? " जमादारानें खडसावलें.

" क...कुच नहीं. पेपर गया. वो धुडतो हाय. " शास्त्रीबुवांनीं मोडक्या हिंदुस्तानींत उत्तर दिलें.

" पेपर ? कोनसा पेपर ? ओर इधर कहासे आया ? "

" गाडीसे निकल गया वारेसे. " शास्त्रीबुवाचें उत्तर.

" अरे बेवकूफ लैन में क्या कर रहा ? मालुम होता है की तुम ठग लोग है. लैन बेकाम करनेकेवास्ते आगया चलो, पकडो सालेकू ! "

शास्त्रीबुवांना घाम सुटला ! "न...न... नहीं. जमादारसाहेब, हम प्रोफेसर लोग है. कालेजमें पढवते है पेपर काढते थे, गाडीमें वारा आगया, पेपर उडून गया ; फूट जायगा तब शोध करता है पेपरका ! " ते गयावया करू लागले. पंतांची तर दांतखीळ वाजू लागली. त्याची ती तारांबळ पाहून सर्वजण खिदळले. शास्त्रीबुवानीं जानव्याची ब्रह्मगांठ हातांत घेऊन " ॐभूर्भुवस्व. " करण्यास आरंभ केला !

" अरे, तुम पोरफासर हो, तो इतने अक्कलमद कैसे हो ? पेपर च्यालू गाडीसे बहार उडा गया लेकिन तुम इधर धुंड रहा. क्या कोई नबाबने तुम्हारा पेपर रोक दिया और उसकू हवासे उडानेकी मनाई किया ? बहोत गाजी पोरफासर हो आप लोग ? देखो उस्मान, गाडीके बहार उडा गया एक कागद का टुकडा, लेकिन लाइन ढूड रहे ये पोरफासर उसके वास्ते ही· हीः ही ! "

" त...तसं नाहीं जमादारसाहेब... " पत जमादाराची कानउघाडणी करू लागले.

" चूप " जमादारानें दरडावलें आणि उस्मानला फर्मावलें, " इसका झ्याडा लेव दोस्त पहले. "

त्या शब्दाचा अर्थ शास्त्रीबुवांना भलताच वाटल्यामुळें त्यांनीं हातांतलें जानवें कानावर चढविलें ! दोघानाही मेल्यासारखें होऊन गेलें. उस्माननें झडती घेतली. शास्त्रीबुवांच्या आगरख्याच्या आंत दडलेलीं सारी पुस्तकें बाहेर निघालीं. आपलीं आंतडीच जणू काय ह्या दुष्टानें बाहेर काढलीं असें शास्त्रीबुवांना वाटत होतें. त्याच्या डोळ्यांपुढें काजवे चमकले आतां हें प्रकरण भलत्याच थराला जाणार ह्याची त्यांना खात्री वाटूं लागली. उस्माननें तीं पुस्तकें दिव्याच्या उजेडात उघडून पाहिलीं. जमादाराच्या डोक्यांत हळूहळू प्रकाश पडला गूढ अर्थानें आपली मान हालवीत ते म्हणाले, " तोबा तोबा ! मै सच्च बोला. ठग लोग है ये. ओ बाई ठेसनपर धूम करती

थी, उसका है ये किताब. देखो. एक रौंडमें च्योरीका तलास लगा दिया. पकडो सालेकू ! ”

“ हां, रिपोर्टमें लिखा है वोहींच किताब है ये. ओ कैसे छुपाया बदमाषने ? ” उस्माननें दुजोरा दिला. चिंतोपतांना आभाळ फाटलें. शास्त्रीबुवांच्या तोंडचेंही पाणी पळालें ! दोघांना ताबडतोब चतुर्भुज करण्यात आलें

दुसऱ्या दिवशीं युनिव्हर्सिटीऐवजीं पोलिसचौकींत सदर प्राध्यापकद्वय खड्या पाहाऱ्यात बसलेलें आढळलें बिचारी गगू ढसढसां रडत पिंजऱ्याच्या बाहेर उभी होती. शास्त्रीबुवा योग्य शब्दानी तिला धीर देण्याचा प्रयत्न करीत होते. कोठून आपल्याला ती पुस्तकें उचलून आणण्याची दुर्बुद्धि आठवली असें त्यांना होऊन गेलें होतें. परीक्षा तर गेलीच गगूकरिता वरसंशोधन करावयाचें तेंही राहिलें आणि वर उलट भयकर बेअब्रू ! अरेरे, परमेश्वरा !

बारा वाजतां जमादार सरल गोडबोले ह्यांना घेऊन चौकींत आले आरोपींच्या पिंजऱ्यात गगूचे वडील आणि पिंजऱ्याबाहेर मुसमुसत उभी राहिलेली गगू पाहातांच सरलला अतोनात आश्चर्य वाटलें. प्रथम तिचा आपल्या डोळ्यांवर विश्वासच बसेना. पण ती पिंजऱ्याजवळ गेली, तेव्हा गगूनें तिला सारी हकिगत सांगितली. सरलचें अत करण जात्याच कोमल हा देखावा पाहून ते विरघळलें. आपल्याकडे कमीपणा घेऊन तिनें जमादाराला सागितलें, “ ही पुस्तक किनई, माझींच आहेत. पण तीं ह्यांनीं चोरलीं नाहींत मींच त्याना दिलीं होतीं वाचायला ! पण झोपेमुळें तें मेलं माझ्या ध्यानांतच राहिल नाहीं. जागी झालें तेव्हा पुस्तक दिसेनात म्हणून घाबरलें आणि वर्दी दिली ही गगू माझी मैत्रीण हिनेंच मागून घेतलीं होतीं माझीं पुस्तक पुण्याच्या प्लॅटफॉर्मवर ! ” आपली कामगिरी फुकट गेली ह्याबद्दल जमादाराना जरा वैषम्य वाटलें. परंतु सरलच्या भाषणांत अशी कांहीं जादू होती, कीं तिच्या विनतीचा अव्हेर करणें त्यांना अशक्य झालें. त्यानीं पुस्तकें परत केलीं आणि त्या दोघांना सोडून दिलें.

“ नि बाई गगू, माझीं मराठीचीं पुस्तक केव्हां परत करणार आहेस ? परीक्षा होऊन गेल्यावर वाटतं ? ” सरलनें हसत हसत गंगूला विचारलें.

“ अय्या ! खरंच की, काकानीं केव्हांच माझ्याजवळ दिलीं होतीं तीं तुला परत द्यायला. पण माझा विसर अस्सा नडतो जिथें तिथें. तशींच पडलीं आहेत टूंकेंत. आतां ही पदराला गांठ मारून ठेवली बघ. घरीं गेलें कीं पहिल तें काम ! तुझीं पुस्तकें



"...पुस्तकांची बाबत ती काय नि मी पोलिसांत वर्दी देतें काय...."

परत करायचीं. बाकी सरल, आज तूं नसती धावून आलीस आमच्या मदतीला तर कसला भयंकर प्रसंग आला होता ग बाई ! काकांच्या धाडसाची तर बाई धन्यच ! ”

“ अं ! जाऊं दे. आतां झाल तें झाल. पुस्तकांची बाबत ती काय नि मी पोलिसांत वर्दी देतें काय ? मला तरी नको होत का कळायला ?.” सरल विनयानें म्हणाली आणि गंगूचा निरोप घेऊन निघून गेली

एका कोपऱ्यांत चोरांसारखे उभे राहून शास्त्रीबुवा आणि चिंतोपत वरील संवाद ऐकत होते. त्यांना काय वाटले असेल हें वाचकाच्या कल्पनेवरच सोपविलेलें बरें ! एवढें मात्र खरें कीं स्थळाच्या वगैरे भानगडींत न पडता उभयतांनीं सध्याकाळच्या गाडीनें तडक पुणें गांठलें ! पुन्हा म्हणून परीक्षेच्या फदात पडायचें नाहीं असा नाककुरागांनी कानाला खडा लावला !






'इट हॅपन्ड वन् नाइट' सारखा नामांकित चित्रपट! आम्हीं तो पैज लावून फॅमिली सर्कलमध्यें बसून पाहायचा असें ठरवलें

"हं, दोन फॅमिली सर्कल द्या बरं." मी तिकिटांच्या खिडकीवर एक रुपया वाजवून घाईघाईनें म्हणालों. लगेच त्रिकिटें देणारानें खिडकीच्या बाहेर तोंड काढून इकडे तिकडे पाहात विचारलें, "फॅमिली कुठें आहे मिस्टर?"

"ही काय?" मी बग्याकडे ऐटीनें बोट दाखवून सांगितलें.

"सॉरी!" तो डोकें आंत घेऊन म्हणाला, "बरोबर बाईमाणूस पाहिजे."

"आणि आम्ही का कुणी वाटेवरचे चोर आहोंत कीं काय? च्या! हा मोठा जुल्म झाला बुवा!"

"बाईमाणसांना घेऊन या."

"अरे, पण नसलीं तर कुठून आणायचीं? तें कांहीं नाहीं. वुइ आर जंटल्मेन. तुम्हांला जंटल्मन आणि मवाली ह्यांतला फरक समजत नाहीं वाटत?"

"बाजूला व्हा मिस्टर. दुसऱ्या जटल्मनला तिकिटें घेऊं द्या!" तो बेधडकपणानें म्हणाला.

मीं हताश होऊन बग्याला हाक मारली आणि म्हटलें,

" आपल्याला नाहीं बुवा जमत बग्या ! आपण पैज हरलों. "

" अच्छा ! टाक रुपया. "

" म्हणजे ? तुला कोण देणार फॅमिली सर्कलचीं तिकिट ? बरोबर बाईमाणूस कुठें आहे आपल्या ? "

" रुपया दे तर खरा ! " त्यानें फुशारकीनें आग्रह चालवला. मीं रुपया दिला. बग्यानें कंपाउंडात जमलेल्या प्रेक्षकांपैकीं एक आठ वर्षांची मुलगी गांठली. तिच्या पाठीवरून हात फिरवीत तोंडें वेडींवाकडीं करीत तो टुर्रुक टुर्रुक, असा कांहीं तरी चमत्कारिक आवाज काढू लागला. बग्याचा तो चेहेरा आणि हावभाव पाहून खुद्द नकलाकार घोडकेदेखील पोटभर हसले असते. मग त्या मुलीची काय कथा ? ती खदखदा हसू लागली.

" नाव काय तुझं बाळ ? " बग्यानें तिला लाडांत विचारलें.

" चपू. "

" शाबास चपू, हुषार आहेस. "

" तुमी दिखिल शिनिमाला आलात का ? " चपूनें विचारलें.

" हो तर. पण चंपू, तुला खाऊ हवा का ? चाकोलेट ? "

" जाऊ मी ? " चपूनें जवळच उभ्या असलेल्या एका तरुणीला विचारलें. तरुणी आगानें सडपातळ असून तिचा बांधा नीटस आणि अवयव रेखलेले होते. ठाकठिकीनें नेसलेलें पिवळें पातळ आणि तोंडावरची बुद्धिमत्तेची झाक तिच्या शरीरगौरवाची अधिकच खुलावट करीत होती. फॅशनेबल् पोषाख केलेल्या एका तरुण गृहस्थाशीं बोलण्यांत गर्क असल्यामुळें चपूच्या प्रश्नाला तिनें नुसत्या मानेनेंच रुकार दिला. तो मिळताच बग्या चपूला घेऊन तिकिटाच्या खिडकीजवळ गेला आणि फळीवर रुपया टिचवून म्हणाला,

" ह. मास्तर ! दोन फॅमिली ! "

मास्तरानें तोंड बाहेर काढून त्या चुणचुणीत पोरीकडे एकवार पाहिलें. त्याचें समाधान झालें असावें कारण त्यानें मुकाट्यानें डोकें आंत घेतलें आणि तिकिटें बाहेर सारलीं !

कबूल केल्याप्रमाणें बग्यानें अगोदर चंपूला चाकोलेट घेऊन दिलें. तें हातांत पडतांच चंपू आनंदानें उड्या मारूं लागली आम्हीं थिएटरांत प्रवेश केला आणि



बसण्याकरितां सोइस्कर जागा पाहूं लागलों. ती तरुणी आणि तिच्या बरोबरचा जंटलमन हेही जागा पाहाण्याच्या उद्योगांत होतेच. इतक्यांत चपू म्हणाली,

" नाना, अहो नाना. मी किनई त्याच्याजवळ बसून शिनिमा पाहाणार."

" कुणाजवळ ? "

" त्याच्याजवळ. " बग्याकडे बोट दाखवून चपूनें हेल काढीत उत्तर दिलें.

" ए चंपे, वेड्यासारखें करूं नको. बस पाहू इथे. " तरुणीने बजावलें.

" अ ! हें काय ग ताई ? तू नाहीं का नानाच्या जवळ बसणार ? तशी मी त्यांच्याजवळ बसणार. खाऊ दिला बघ त्यानीं मला ! " असें म्हणून तिनें चाकोलेटची एक वडी तोंडात घालून ' टटॉ ' असा आवाज आपल्या चिमुकल्या जिवणींतून काढला.

" चल, वात्रट कुठली. तिथें ग काय गाठोड पुरलय् तुझ ? " ताईसाहेबांनीं समज दिली पण चंपू मुळींच त्या दटावणीला भीक घालीना तिचा हट्ट पाहून नाना म्हणाले,

" आय से, व्हाय डू यू वरी ? बसू दे तिला आवडेल तिथे."

मग मीच बग्याला म्हणालों,

" घे रे त्या पोरीला आपल्यापाशीं घटकाभर "

" ये ह बाळ इकडे. ही बघ छान जागा आहे इथें. " बग्या चपूला म्हणाला आणि हातांनीं बोलावू लागला चपूही धावतच आमच्याकडे आली आणि तें जोडपें मुकाट्यानें मागच्या एका रांगेंत बसलें.

लवकरच ' शो ' सुरू झाला. अंधार झाल्याबरोबर चपू एकदम बग्याला बिलगली आणि मोठ्यानें म्हणाली, " इश्श ! दिवे हो कशाला मालवले सिनेमावाल्यानीं ? "

आजूबाजूच्या लोकांनीं चंपूच्या त्या उद्गाराचे हसून कौतुक केलें.

बग्या तिला म्हणाला, " अग, पडद्यावरचीं चित्रें नकोत का दिसायला आपल्याला ? आतां बघ कशीं स्पष्ट दिसताहेत तीं "

" अहो, पण आपल्याला पाठीमागचे लोक कुणीच दिसत नाहींत."

" त्यांना काय पाहायच चपू ? आपल्याला सिनेमा पाहायचा ना ? "

ह्यावर चपू जरा वेळ स्वस्थ बसली पडद्यावर पहिल्यानें जाहिराती दाखवल्या जात होत्या. एक जाहिरात चपूनें मोठ्यानें वाचली, " बाळतिणींची खास व्यवस्था ! "

" आमची आई पण आतां बाळतीण होणार आहे ! " तिनें पोक्तपणाचा आव आणून बातमी दिली. लोक हसायला लागले.

बग्या तिला हळूच म्हणाला, "हां, चपे, अस मोठ्यांदा बोलायचं नाहीं हो. सिनेमावाला आपल्याला हाकलून देईल अशानीं!"

थोडा वेळ चपू कांहीं बोलली नाहीं परंतु पडद्यावरची एक नटी गात असतांनाच तिला कांहीं तरी हुकी येऊन तिनें विचारलें, "अहो, ह्या बाईला तिच्या बाबांनीं मार दिला वाटत? चाकोलेट दिल म्हणजे उगी राहील. नाहीं का?"

आता मात्र लोकाच्या कौतुकाचा भर ओसरला. एक दोघांनीं तर शुक् शुक् असा आवाज काढून आपला निषेध व्यक्त केला. बग्यानें चपूला पुन्हा दटावलें.

पुढें एका सीनमध्ये कोणीं कोणाचें तरी चुंबन घेतलें तें पाहातांच चपू एकदम उद्गारली, "अय्या! केवढी मोठी बाई नि तो बुवा तिचा खुशाल पापा घेतोय्? अहो, तो वेडा आहे का हो?"

बग्याला कसेंसेंच वाटायला लागलें दुसरे प्रेक्षक 'गप् ग ए छोकरी' असें म्हणून चपूला दटावू लागले. त्या 'नानानें' चपूला आमच्याजवळ का बसू दिलें हें आतां माझ्या लक्षात आलें. चपू टाळ्या वाजवीत पुन्हा ओरडली, "अय्या! त्या दुसऱ्या बुवानेंही घेतलान् तिचा पापा!"

बग्या अगदीं खजील झाला आणखी काहीं वेळानें पडद्यावर डान्स चालू असतां चपी बग्याला एखादें गुपित सागावे अशा आवाजानें म्हणाली, "इश्श! अहो ह्या बाया परकर नेसायला विसरल्या की! अबाबाई चिंबा .."

"ऐक चपे!" बग्यानें कावऱ्याबावऱ्या नजरेनें चहूकडे पाहून तिच्या तोंडावर हात ठेवीत म्हटलें. सुदैवानें चपूच्या उद्गारांकडे कोणाचें लक्ष गेलें नाहीं.

मीं बग्याला सुचवलें, "अरे, एखादी वडी शिल्लक असली तर दे बाबा तिला. नाहीं तर वचवचणार कार्टी काहीं तरी!"

पण चाकोलेट संपलें होते आणि चपूची चळवळ अधिकाधिक जोरानें सुरू झाली होती.

शेवटीं तर खुर्चीवरून खालीं उतरून ती खालीं बसायला जागा शोधू लागली तेव्हां तिचा खटाटोप बग्याच्या ध्यानांत आला आणि तिला आवरून तो म्हणाला, "हां हां, चंपू, इथे नाहीं हो."

"मला धाई........" चपू कुरकुर करू लागली.

नाक मुठींत धरून बग्याला उठावें लागलें. "काय पीडा आहे शिंची!" असें म्हणून चरफडत त्यानें चंपूचा हात धरला आणि खुर्च्यांच्या रांगांमधून धडपडत दरवाजा

गांठला. मला त्याची कींव आली. चंपूच्या उपद्यापामुळें चित्रपटांतील चांगल्या भागाला तो मुकला.

कांहीं वेळानें तो परत आला तेंव्हां पाहातों तों चपू उघडी बब ! मीं आश्चर्यानें तिला विचारलें, "अग ए, हें ग काय ? आंगातलं काय केलस ?"

"भियूय्ल !' मी पय्यूये !" ती म्हणाली. तिच्या तोंडांत चाकोलेटचा बोकणा होता. बग्याच्या हातांत चपूच्या ब्लाऊझचा पिळा होताच मीं विचारलें, "काय झालं बाबा ?'

"कपाळ माझ." तो उद्वेगानें म्हणाला, "मोरींत पडली कार्टी. ब्लाऊझ धुवावा लागला. इंटरव्हल केव्हां होतय् आणि कार्टीला एकदा तिच्या आईबापाच्या स्वाधीन केव्हां करतों अस झाल आहे मला !"

"म्हणजे ? इटरव्हल कशाला पाहिजे ? आतांच कां नाहीं केलीस ती ब्याद त्यांच्या स्वाधीन ?"

"पोरगी ही अशी, तर तिचे आईबाप तरी कसे सरळ असणार ? मघाशीं त्या तिथें बसले होते." बग्या अधारांत पाठीमागल्या बाजूला बोट दाखवून म्हणाला, "पण आतां जाग्यावर नाहींत !"

"आं ?" मीं दचकून उद्गार काढला

"अरे, हीं तरुण जोडपीं अशींच. सिनेमांतल्या अधारांत ऊत येतो त्यांच्या प्रेमाला. तीं का एका जागीं ठरायचीं आहेत ?"

बग्यानें मुकाट्यानें समोरच्या कठड्यावर चंपीचा ब्लाऊझ वाळत घातला तिनें आता भलतेंसलतें विचारून आमची फजिती करू नये म्हणून बग्यानें तिच्यावर चाकोलेटचा सारखा मारा चालू ठेवला होता.

जरा वेळानें चपूला शेंगा खाण्याची लहर आली. पुन्हा बग्यानें बाहेर जाऊन शेंगा आणल्या

विश्रांति आली आणि दिवे लागले. 'सुटलों एकदाचे' असे समाधानाचे उद्गार काढून आम्ही चपूला तिच्या आईबापांकडे पोचवायला निघालों. परंतु काय आश्चर्य ! फॅमिली सर्कलमधल्या एकूण एक रांगा धुडाळल्या तरी त्यांचा पत्ता लागेना ! बग्याचा जीव खालीं वर व्हायला लागला. कदाचित् ते बॉक्समध्यें गेले असतील अशी मीं कल्पना काढल्यामुळें आम्ही बॉक्सेस पालथ्या घातल्या, तरी नाना आणि ताई सापडेनात. शो सुरू व्हायच्या वेळीं ते जेथें बसले होते तेथील मडळीजवळ चौकशी करतां समजलें,

कीं शो सुरू झाल्यावर वीस पंचवीस मिनिटांनीं ते उठून गेले. परंतु ह्यापेक्षां जास्त माहिती कोणाला देतां येईना. शेवटीं शका नको म्हणून सगळें थिएटर तपासलें, पण नाना आणि ताई दोघेंही बेपत्ता !

" चांगल भोवल बरं फॅमिली सर्कल, मोरू !" बग्या वाईट तोंड करून म्हणाला.

" चला, आतां बाहेर पडा काहीं तरी केल पाहिजे " मींही खिन्नपणें सुचवलें.

" आजचा सिनेमा नव्हता आपल्या नशिबात एवढ खरं."

असें म्हणून आम्ही चपूला घेऊन बाहेर पडलों अधार पडूं लागला होता. चपूचें काय करायचें ह्या विचारानें दोघेही भाबावून गेलों होतों

बग्यानें सहज शका काढली, " काय रे ? पण पोटच्या पोरीला टाकून जाववलं तरी कसं ह्याना ? "

" कुणाला ठाऊक काय लफडं आहे ते !" मी त्रासून म्हणालों.

" चपे, माझे आई " बग्या तिच्याकडे वळून विचारू लागला आणि एकदम थांबला ! कारण ती बया अजून उघडीच होती !

" अरे माझ्या कर्मा ! " बग्या कपाळावर हात मारून म्हणाला, " हिचा ब्लाऊझ आंतच राहिला की !"

" आणि अहो !" चपीनें आठवल्यासारखें करून सांगितलें, " मीं किनी त्याच्या खिशांत माझ्या गळ्यांतली एकदाणी पण काढून ठेवलीय् हरवायला नको म्हणून."

" च्यागल केलस बरं कार्टे ! म्हणे खिशांत एकदाणी ठेवली. ढालगज कुठली !" बग्या तिला वेडावीत म्हणाला, " खखाय् रत्न आहे बघा. कुठनं अवदसा आठवली आणि नादीं लागलों हिच्या, कुणाला ठाऊक."

" हें बघ बग्या," मी त्याला शात करण्यासाठीं म्हणालों, " आतां झाल तें झालं. त्याचा त्या अजाण पोरीवर राग काढण्यात काय हंशील आहे बरं ? चल, आपण ब्लाऊझ घेऊन येऊ अगोदर."

आम्ही पुन्हा थिएटरच्या दारापाशीं गेलों डोअरकीपर पास मागू लागला. आम्हीं इतका वेळ पासाची कोठें चौकशी केली होती ? अर्थात् पासाशिवाय तो आम्हाला आंत सोडीना. त्याला सगळी कर्मकटकट सांगितली, दादापुता केलें, पण तो दाद देईना. आम्हांला हसत हसत म्हणाला, " आणखी दोन ग्लास झोका सोडा फाउटनवर, म्हणजे ह्याच्यापेक्षां चांगल्या थापा सुचतील."

आम्हांला घाम फुटला. एकंदर परिस्थितीच अशी होती कीं कोणालाही

डोअरकीपरसारखीच शका यावी. शेवटीं बग्याला त्याच्या खिशांत होतें नव्हतें तें सगळें त्याच्या हातावर ठेवावें लागलें, तेव्हां त्यानें आत सोडलें. पुन्हा लोकांच्या शिव्या खाल्ल्या, खुर्च्यांच्या दांड्यांना अडकून धोतरें टराटर फाटलीं पायावर पाय पडल्यामुळें एक दोघाच्याकडून बुक्केही घेतले, पण इतकें करून आम्हांला ब्लाऊझ मिळाला का ? नांव कशाला ! सगळा कठडा बग्यानें चाचपडून पाहिला, पण चपूचा ब्लाऊझ सापडेना.

" अगोदर कार्टीला घालायला घेतल पाहिजे कांही तरी " रस्त्यावर येतांच बग्या म्हणाला, " नाहीं तर लोक नसत्या कुशका काढायचे ! "

" होय ना " मी खिशात हात घालून म्हणालों, " पण आपल्याजवळ तर दिडकी नाही बुवा !"

" आं ! दिडकी नाहीं ?" बग्याने दचकून विचारलें, " मग आटोपलाच कारभार ! अरे भोन्या, माझ्याही खिशात आता पैसा नाहीं "

" राम कृष्ण हारी ! मग आता ?"

" आतां काय ! एखाद्या ओळखीच्या दुकानदाराकडे तोंड वेगाडल्याशिवाय भागायच नाही ! "

एकदर घटनेचें आमच्या मनाशींच आश्चर्य करीत आम्ही मुकाट्यानें आमच्या नेहमींच्या दुकानदाराकडे निघालों. वाटेत भेटणारे लोक आमच्याकडे चमत्कारिक नजरेनें पाहात आणि गालांतल्या गालात हसून पुढें जात. आम्हीही जसें काहीं आमचें त्यांच्याकडे लक्षच नाहीं अशा ऐटीनें कांहीं तरी गप्पा मारू लागलों !

चपूकडून तिच्या ' ई-प ', किंवा निदान घराचा ठावठिकाणा काढावा ह्या इरायानें बग्यानें चंपूच्या पाठीवर थोपटीत विचारलें,

" तुझं आडनांव काय बाळ ?"

" चपू. "

" अं हं. तें नव्हे. आडनांव ? "

" म्हणजे काय बाई ? "

" अग हें बघ, माझ नांव बगाराम, पण आडनाव ढेकणे. तस ह्याच नांव मोरोबा. "

" अग बाई मोरांबा का ? हॉ ! "

" मोरांबा नव्हे ग, मोरोबा. आणि आडनांव झुरळे ! तसं तुझं आडनांव काय ?...."

" मला किनई वात्रट चंपू म्हणतात. म्हणजे माझं आडनांव वात्रट. " ती म्हणाली

वाजवून म्हणाली.

" छान ! " बग्या आपल्याशींच म्हणाला, " वात्रटच काय ? पण कुचला, बचनाग किंवा धोतरा अशापैकीं कांहीं असत तरी तें शोभलं असत. "

" बर, तुम्ही राहातां कुठें ? " मीं विचारलें.

" आम्ही होय ? मारुतीजवळ राहातों. "

" हात्तिच्या, मारुतीना कुठे तोटा आहे इथे ? कुठच्या मारुतीजवळ राहातां तुम्ही ? "

" अहो त्या मारुतीला शेपूट आहे एक लांबच लांब रोज त्याच्यापुढें खडीसाखर ठेवलेली असते. आम्ही खेळायला गेलों म्हणजे खडीसाखर देतो मारुती आम्हाला !"

मीं एक निराशेचा निश्वास टाकला त्या पोरीचा पत्ता मिळणें अशक्य होते !

बाजारपेठेंत जातांच आम्हाला आणखी एक धक्का बसला. आमचें नेहमींचें दुकान बंद झालें होते ! तेव्हा आम्हाला दुसऱ्याच एका दुकानांत चढणें भाग पडलें.

दुकानदारानें लवकरच एक कपडा शोधून काढला आणि झटक फटक करून आमच्या हाती दिला मी बळेंच वेळ काढण्यासाठीं तो न्याहाळून पाहू लागलों आणि त्याची वीण कशी काय आहे तें हातानीं चाचपून पाहू लागलों बग्यानेंही तसाच आव आणला. जरा वेळ कपड्याची परीक्षा केल्यावर तो खाकरला आणि जाण्याची घाई आहे असें दाखवून म्हणाला,

" बरं आहे शेटजी, उद्यां पैसे देतों "

" काय नांव आपल ? "

" बगराम ढेकणे ! " बग्यानें मान चढवून थाटानें उत्तर दिलें.

" नांव तो ऐकला नाय कवाबी ! " शेटजी म्हणाले. साहजिक आहे. ढेकणे या नांवाच्या माणसावर विश्वास ठेवणार कोण ?

" अहो, हें काय ? ह्या पांजरपोळाजवळ ! पिसव्यांचा वाडा. "

" पेशव्यांचा वाडा ? तेमदी तर कमेटी हाय ! "

" पेशव्यांचा नाहीं हो. पिसव्याचा. आपले घारूअण्णा पिसवे, फार मोठं घराणं ! "

" हां हां असेल असेल पर पेला पैसा टाका ! " दुकानदार दारांतच उभा राहून तगादा करू लागला.

"त्याचं असं झाल शेटजी, आमचा नेहमींच रोखीचा व्यवहार असतो. उधार माल घेणं जन्मांत ठाऊक नाहीं, पण......"

परंतु बग्याची चर्पटपंजरी पुरी व्हायच्या आंतच शेटजींनीं त्याचें बकोट पकडलें.



" हां हां शेटजी, हें काय ? " बग्या चाचरत म्हणाला, " कायदेशीर इलाज करा. असा अत्याचार नाहीं कामाचा ! "

" तसा नाय, कायदेशीरच करते " शेटजी आमच्याकडे संशयानें पाहात आपल्या सोबत्याला म्हणाले, " भाई मनसुख, तमे आ चावडीमा जावो ने नाईकजीने खबर आपो ! "

होतें नव्हतें तेवढें अवसान गोळा करून बग्या म्हणाला, " हें पाहा शेटजी, ही थट्टा पुरे झाली आम्ही अब्रूदार माणस आम्हांला हा चावटपणा खपायचा नाहीं. " हें अल्टिमेटम् देऊन दुकानांतून सूबाल्या करण्याची आम्हीं तयारी केली पण शेटजी वस्ताद ! तो हात पसरून दारातच उभा राहिला आणि मिस्किलपणें हसत म्हणतो, " मस्करी कोण करेल ? हवालदार येईल आता, तेला करा वार्ता."

" पण शेटजी, आम्हीं केलयू तरी काय अस ? "

" छोकरी कुनाची आणली ही ? "

" कुणाची म्हणजे ? " बग्या लटक्या रागानें म्हणाला, " आमचीच. "

" ए छोकरी, बाबा कुठें हाय तुझा ? "

" कोण ? माझे बाबा ? " चपू उद्गारली. तिच्या उत्तरावर आमचा जीव टांगून राहिला होता.

" हां हां ! तुझे बाबा ! "

" बाबा गांवाला गेलेत. मला मोटार घेऊन येणार आहेत. "

चंपूनें बॉबच टाकला !

" का ? रावसाहेब अब्रूदार, इयाली का आता च्यांगली ? अशा बदमाषीपेक्षां सरळ अफू खाल तर बरा ! "

कांहीं वेळानें मनसुख एका पोलिस शिपायाला घेऊन आला. एकदर हकिगत त्याने शिपायाला वाटेंतच सांगितली असावी, कारण शिपायानें तरातरा दुकानांत फिरून अगोदर चपूला उचललें आणि बग्याचें बकोट धरून तो अधिकाराच्या आवाजांत म्हणाला, " चलो सीधे चौकीपर ! "

चौकीवर गेल्यावर थोड्या वेळानें एक मध्यम वयाचा साधाच पोषाख केलेला गृहस्थ आला. त्याला नायकानें लवून सलाम ठोकला, त्यावरून तोच हवालदार असावा हें उघड होतें. आंत येतांच तो कागद पुढें घेऊन बसला आणि नायकाला म्हणाला, " चलो, जलदी करो नाईक. आरोपी कोन है ? "

" स...साहेब, आम्ही आरोपी नाहीं! आमचं सगळं म्हणण ऐकून घ्या." बग्यानें सुरुवात केली.

" खामोष!" नाइकानें तरडावलें.

" काय सागणार तुम्ही ? ही मुलगी कुणाची ? सागा लवकर."

बग्यानें एकंदर हकिगत सविस्तरपणें सागितली.

मग हवालदारानें चपूला जवळ ओढून विचारलें,

"छोकरी, तुझ घर कुठें आहे?"

"खडीसाखरवाल्या मारुतीजवळ."

"हे कोण तुझे?" बग्याकडे बोट दाखवून हवालदारानें विचारलें.

"हे? ढेकूण, अहो ढेकूण चावतो, नाहीं का?"

"आणि हे?" माझा निर्देश करून हवालदारानें प्रश्न केला.

"हे झुरळ." चपू हसून म्हणाली, "अहो, ह्यांच्या मिशा झुरळासारख्या लांब लाब आहेत. आणि तुमच्या मिशा सागू कुणासारख्या आहेत त्या?"

"नको, तें जाऊ दे" हवालदार तिला शाबासकी देत म्हणाले, "पण मला सांग हे तुझे बाबा का?"

"अ ह"

"मग तू कशी सापडलीस ह्यांना?"

"खाऊ दिला त्यानीं मला शिनिमांत."

"ह! बरं पुढें?"

"आणि माझा ब्लाऊझ हरवला त्यांनीं. त्याच्यांत एकदाणी ठेवली होती मीं! ती गेली. आतां आई मार देईल!"

" ऐका! आणि काय सोदेगिरी चालवली आहे मघापासून दोघांनीं!" हवालदारानें आमच्याकडे पाहून पोलिसाला म्हटलें.

"आणि अहो," चपू बग्याजवळ येऊन लडिवाळपणानें म्हणाली, "एवढे माझे पत्ते ठेवा तुमच्याजवळ नाहीं तर बुवा हरवून टाकील." असें म्हणून तिनें हातांतले काहीं तुकडे बग्याजवळ दिले.

पण त्याच्या हातांतून हवालदारानें ते खसकन हिसकावून घेतले आणि दिव्याच्या उजेडांत न्याहाळून पाहिले. त्याचा चेहेरा गभीर झाला! डोळे रागानें गरगर फिरवीत त्यानें बग्याला विचारलें, "काय रे बेवकूफ? हेही धदे करतां वाटतं?"

' म्हणजे ?"

"बेटिंगच्या चिठ्या आहेत ह्या!"

"काय? म्हणतां तरी काय हवालदारसाहेब? आम्ही असल्या फंदांत पडणारे नव्हे हो!" बग्या दीनवाणीनें म्हणाला माझ्या डोळ्यापुढे सगळी खोली गरगर फिरू लागली! त्या चिठ्या चपूजवळ कशा आणि कोठून आल्या ह्याचा विचार करता करतां मला एकदम आठवलें कीं तिनें त्या कापडवाल्या शेटजीच्या दुकानात आमचा डोळा चुकवून गोळा केल्या होत्या

"देखो नाईक, ए दोनो आदमीकू कोठडीमें बदोबस्त करके रख्खो बहोत बिलदर बदमाश दिखता है ये! बुंदेलखडसे वो टोळी आगई थी? है क्या मालूम?"

असें म्हणून हवालदारानीं कागदावर कांहीं तरी खरडलें आणि तो खिशांत घालून ते चालते झाले आम्हीं आमच्या 'स्टार्स' ना यथेच्छ शिव्या दिल्या आणि येईल त्या प्रसगाला तोंड देण्यासाठीं मन घट्ट करून बसलों आणि डोळे मिटून घेतले चंपूसाठीं एका इसमाला थोडें दूध आणायला पाठवून देऊन नाईक आपला दरवाजांत पाहारा करीत बसला. चपू एका वर्तमानपत्रातलीं चित्रें पाहाण्यांत दग होऊन गेली होती!

वीस एक मिनिटे होऊन गेलीं असतील; इतक्यांत 'नाईक, अहो नाईक!' अशा कोणी स्त्रीनें मारलेल्या हाका आमच्या कानावर आल्या. पेंगत असलेले नाईकसाहेब दचकून जागे झाले आणि विचारू लागले, "कौन है?"

"मी आहें, घुगुरड्यांची पिलूताई! ऐकलत का, माझ्या दोन मुली संध्याकाळपासून ज्या नाहींशा झाल्या आहेत त्यांचा अजून पत्ता नाहीं!"

"क्या नाम?"

"पिलूताई घुगुरडे! उठ लवकर, मुलींचा तपास करायला हवा.'

"तोबा तोबा! बुदेलखंडका ये सोका-इ-डाकू आदमी है या सैतान है? इतनी लडकियां दर दिन उठाके ले जायगा तो शहरमें औरत देखनेके भी मुष्कील हो जायगा!"

"अरे मेल्या, काय बडबडतो आहेस? मी सांगतेंय् काय नि हा निलाजरा बरळतोय् काय? का प्यायला बियला आहेस?"

"नहीं नहीं बाई, समज हुवा बराबर आपकी दो लडकियां बेपत्ता है. कैसी है

लडकियां ? ”

“ एक आहे आठ वर्साची आणि दुसरी घोडी आहे. ”

“ घोडी ? अब तो लडकी बोला पहिले ! ”

“ होय रे मेल्या ! लडकीच आहे पण चांगली सतरा वर्सांची आहे म्हणून घोडी म्हटल ”

“ अच्छा. और क्या ? ”

“ धाकटीच नाव चपू नि थोरलीच पद्मा ”

“ चपू ? बराबर है ख्याल ? ”

“ मग ? माझ्या मुलीच नांव विसरेन की काय मी ? ”

नाईकसाहेब आत आले आणि चपूला घेऊन बाहेर गेले

बाहेर जातांच चपूनें आई म्हणून मारलेली हाक माझ्या कानावर आली. लगेच पटापट मुके घेतल्याचा आवाजही आला चपू म्हणाली, “ ए आई, घरीं चल ना गडे ! ”

“ होय ह बाळ. घरींच न्यायला आलेयू मी. कुणीं नेल होत माझ्या छबकडीला ? ”

“ दो बदमाष है बैठे है अदर सोका-इ-डाकू ! बुदेलखडका सैतान ! लड़कीकू लेके जा रहे थे अपने मुलुख ”

“ खरंच का ? काय बाई, ऐकाव तें नवलच ! ” असें म्हणत चपूची आई सरळ आंत आली.

निदान तिच्या देखत तरी आपली शोभा होऊ नये अशी आमची उत्कट इच्छा होती. पण तेंही कोठलें चुकायला ? जशीं कांहीं कोणी हिंस्र श्वापदें कोपऱ्यांत पडलीं आहेत अशा सावधगिरीनें पिल्लताई दूर उभ्या राहून आमच्याकडे तिरस्कारानें पाहूं लागल्या आणि म्हणाल्या, “ अगबाई, नाईक, ह्यांना नीट बांधून ठेवलं आहे ना ? ”

“ डरो मत, कुछ नहीं करेगा ” नाइकानें आश्वासन दिलें.

“ ख्वाय् ग बाई धारिष्ट मेल्याच ? आणि दिसायला कसे साळसूद ! असला भयंकर लुटारूपणा आणि तोही भर दिवसा ? छे छे छे ! रामा, तुलाच रे बाबा डोळे. ”

“ देखो सोका-इ-डाकू. ” नाईक बग्याला दडुका दाखवीत म्हणाले, “ वो दुसरी छोकरी कैसी थी ? सच बात कहना. ”

“ बिलकुल तल्लख. ” बग्या सांगू लागला.

" माझी पमी आहेच हुषार. विंग्रजी तर अशी वाचते फडाफडा नि बोलत

" पीली साडी और गेना जाकीट ? "

" काय ? प्यायली म्हणतोय् मेला ? "

" प्यायली काहीं नाहीं. पिवळ पातळ म्हणताहेत ते. " मीं खुलासा केला.

" होय ना? फार महागाईचं आहे तें किती बरं पडले त्याला? गेल्या पुसांत घेतलं पाहा..."

" रिस्टवॉच आणि दोन बिलवर होते हातांत. " मी म्हणालों.

" शकाच नको. "

" गालाला खळी पडते हसतांना. पायांत पपूशू आणि आंबाड्यावर डोलत फूल."

" अरे चाडाळा, इतक्या बारीक सारीक खुणादेखील पाहून ठेवल्यास?"

" अच्छा तो बोलो, कहां ले गया छोकरीकू? " नाईक खेकसला.

" देवाशपथ आम्हाला ठाऊक नाहीं "

" बाई, कुछ्छ फिकर मत करना. बराबर ठीक कर देंगे सालेकू. " नाईक पिल्लूताईंना म्हणाला. इतक्यात चंपूला काय वाटलें कोण जाणे? ती एकदम पुढें येऊन म्हणाली,

" आई, नाना किनई ताईला घेऊन गेले. " चपूचे ते पहिलेच आमच्या बचावाचे उद्गार !

" कोण नाना? " पिल्लूताईंनीं तिला विचारलें.

" अग ते ! हौदाजवळ राहातात ते त्याच्या बागेंतल्या बगल्यांत चित्रं आहेत मोठालीं ! आंघोळ करणाऱ्या बाईचं चित्र ! आपण एकदा नव्हतों का गेलों चित्रं पाहायला त्यांचीं ? "

" अग बाई पद्माकर चिलटे तर नव्हे? उलट्या काळजाचा मेला ! "

" आपल्या बाबांना त्यानीं.नाहीं का कृष्णाची छानदार मूर्ति करून दिलीन् ? "

" चिलट्यांचा नान्याच तो ! "

" आमी किनई शिनिमाला गेलों होतों ना? तेव्हां ताई बसली होती मामांच्यापाशीं. " आणि बग्याकडे बोट दाखवून चपू गुपित सांगण्याच्या आविर्भावानें म्हणाली,

" ह्यांनीं मला चाकोलेट दिल म्हणून मी ह्यांच्याजवळ बसलें शिनिमा पाहायला. हे फार चांगले आहेत माझा ब्लाऊझ त्यांनीं धुतला. पण तो खालीं पडून हरवला ! "

" चंपा...चंपे...चंपू !" बग्याच्या डोळ्यांत आनंदाश्रु उभे राहिले. चंपूचे पटापट



" ह्यांनीं मला चाकोलेट दिलं म्हणून मीं ह्यांच्याजवळ बसलें शिनिमा पाहायला."

झोंपे घेण्यासाठीं उभारीनें तो पुढें सरसावला, पण पोलिसानें त्याला तसें करू दिलें नाहीं.

" जगदंबे ! पोरगी परत सुखरूप येऊ दे. खडीसाखर वांटीन खणांनारळांनीं ओटी भरीन तुझी ! " पिल्लूताईनीं नवस आरंभले आणि त्या तोंडांतल्या तोंडात स्तोत्रें म्हणू लागल्या

आंत अशी गडबड चालली आहे तों बाहेर एक टांगा उभा राहिला. त्यांतून दोन माणसे खालीं उतरली पैकीं एक चौकशी करू लागला, " घुगुरड्यांच्या पिल्लूताई आल्या आहेत का इथें ? "

" होय, कोण आहे तें ? " करीत पिल्लूताई बाहेर गेल्या आलेल्या इसमाला पाहातांच, " कोण ? नान्याच का मेला चिलट्यांचा ? अहो नाईक, पाहातां काय ? हाच तो भामटा ! " अशी सरबत्ती त्यानीं सुरू केली

नाईक घाबऱ्याघाबऱ्या बाहेर गेला पण लगेच एका तरुणीचा आवाज आला

" आई, हें मांडल आहेस काय इथें भर रस्त्यावर ? आणि भलतच काय बोलतेस त्यांना ? " आम्ही तो आवाज ओळखला !

" त्यांना ? "

" हो ! " पद्मा एकदम लाजून म्हणाली, " आमच प्रेम आहे ! "

" कुणावर ? ह्या सटरफटरावर ? "

" सटरफटर कसे ? स्कल्प्टर आहेत ते. "

" समजलें ग ! आणि तू ह्याच्या नादीं लागलीस ? आणि तू रे मेल्या ? "

" तेंच तर विचारायला आलोंय् मी. " नानानें खुलासा केला, " आम्हीं लग्न करायच ठरवलंय् ! "

" अँ ? जळ्ळ लक्षण मेल्यांच. सिनेमाला जातां काय, पोरीला लोकांच्याजवळ सोडून पळतां काय, आणि लग्न जमवून निर्लज्जपणानें सांगायला येतां काय ! साराच चमत्कार ! "

" मग लग्न करून का सांगायला यायच आई ? "

" चल, चहाटळ कुठली. आणि तुला करायचे होते तालेवारे तर त्या बिचारीला कशाला घेऊन गेलीस ? बेधडक थिएटरात तिला टाकून चालती झालीस ती ? अग तुमचीं मनंच ठिकाणावर नसतात कीं काय ? "

" तसं नव्हे आई. " पद्मा सांगू लागली, " आम्ही किनई सिनेमाला गेल्यावर आम्हांला एक गृहस्थ भेटले. त्यांनीं चपूला खाऊ दिला नि चंपू बसली हट्ट घेऊन

त्यांच्याजवळ. तशी काहीं वाटच्या चोरापाशी नाहीं टाकली. किती छान होता ग सिनेमा ? "

" आपल्या फाळक्यांच्या लंकादहनापेक्षां का चांगली फिलीम असणार आहे ? "

" अग लंकादहनाला काय करतेस ? पोरखेळ तो ! ह्या फिल्मच्या नखाची तरी सर येणार आहे का लंकादहनाला ? "

" नाव काय सिनिमाच त्या ? "

" इट् हॅपन्ड वन् नाइट् "

" अस्सं ! "

" स्टुडिओ पाहायला येतेस का माझा ? " त्यांनी मध्येच विचारलें 'हं' मी चटकन् बोलून गेलें. 'चला, आताच जाऊ ' त्यांनीं आग्रह केला 'पण चंपू ?' 'अं ! सिनेमा सपायच्या आत आपण परतदेखील येऊ ' त्यानी सांगितल.

" मग आम्ही त्याच्या बागेंतल्या बगल्यात गेलों आई, किती फक्कड आहे स्टुडिओ त्यांचा ! नाना तऱ्हेचीं चित्र पाहून मी तर थक्क झालें बाई एकेक आकृति अशी सुदर नि कलापूर्ण आहे कीं पाहातच राहावे डोळेभरून ! त्याच्या कलाकुसरीची मला धन्यता वाटायला लागली. आणि तिथें इतका वेळ गेला आई ! "

" चांगल केलत बरं पोरानो. " पिल्लूताई सर्व ऐकून म्हणाल्या, " तुमची चैन झाली पण इकडे त्या बिचाऱ्या गृहस्थावर केवढा प्रसग आला ? बिचाऱ्यांनीं चंपूला सांभाळली तें गेलं कुणीकडेच आणि वर हे धिंडवडे ! "

" अग बाई, पण अस कस झाल ? "

" पमे, कार्ट, चपीला का सागता येणार आहे आपल्या घराचा ठावठिकाणा नि आपलं नावगांव ? "

" अय्या, खरंच की हें नव्हतं आल माझ्या लक्षात ! "

" कस येईल ? जा आता त्याची अगोदर क्षमा मागा ! "

त्याप्रमाणें पद्मा आणि पद्माकर आत आलीं आणि झालेल्या प्रकाराबद्दल त्यांनीं मनापासून दिलगिरी प्रदर्शित केली

ती एकदाणी पद्मेच्याच गळयांत होती चपूला नकळत तिनें ती आपल्याजवळ ठेवली होती म्हणून बरें झालें.






चिरंजीव राम रबडे घरांतून पळून गेल्याला आतां तब्बल चार महिने लोटले असतील. नारायणरावांनीं आपल्या मुलाचा शोध लवकर लागावा म्हणून पोलीसांत वर्दी दिली होतीच ; पण शिवाय चार मित्रांनीं जे जे मार्ग सुचवले, त्या त्या सर्व मार्गांनीं त्याचा तपास लावण्याची अविश्रांत खटपट केली, पाण्यासारखा पैसा खर्च केला, पण चिरंजिवांचा पत्ता लागण्याचें चिन्ह दिसेना.

शेवटचा उपाय म्हणून एका मित्राच्या सल्ल्याप्रमाणें त्यांनीं ' केसरी 'त पुढीलप्रमाणें जाहिरातही दिली.

" अरे रामचंद्रा, आमच्यावर रागावून तूं घरांतून गेल्याला चार महिने झाले. तूं गेल्यापासून तुझ्या आईच्या डोळयांचें पाणी खळलेलें नाहीं. माझ्याही डोळ्यांत आतां पूर्वीचें पाणी राहिलें नाहीं. या घरांत आतां कांहीं राम राहिला नसल्यामुळें तुझ्या मावशीवर राम म्हणण्याची पाळी आलेली आहे.

तुझीं चिमुकलीं भावंडें ! हाय ! घरट्यांतून पावसांत फेकून दिलेल्या चिमणीच्या पिलांसारखीं त्यांची दैना. बाळ रामू, कसा रे तूं आम्हां सर्वांना दुःखांत लोटून गेलास !

हें बघ माझ्या चिमण्या, आतां आम्ही तुझ्या इच्छेबाहेर नाहीं. तुला आवडेल त्या मुलीबरोबर तूं आनंदानें लग्न कर. रिसबुडांची सखू आम्हीं तुझ्या गळ्यांत बांधणार

नाहीं. पण लौकर घरी ये. हांसत ये, नाचत ये.

तुझा शरपजरीं पडलेला पिता

**नारायणराव"**

जाहिरातींतील मजकुरावरून चिरंजीव रामू कितपत चिमुकला होता हें वाचकांच्या ध्यानांत आलेंच असेल

*　　　　*　　　　*

ही करुणरसात्मक जाहिरात पाहून रामू घरीं तर आला नाहींच. उलट त्यानें केसरींतून ... आपलें जाहीर उत्तर दिलें—

"...काका,

तुमच्या पायाच्या पुण्यायीन माझ ठीक चालल आहे. उपासमार होत नसून उलट चैनच आहे म्हणानात. आईला म्हणाव उगीच काळजी करू नको. रामू योग्य वेळ येतांच अवतीर्ण होईल मनाजोगती मुलगी सापडावीशी वाटतेयू; नक्की झालें म्हणजे जोडीनेच आशीर्वाद घ्यायला येऊ मुलाना म्हणाव तोंवर रोज रामरक्षा म्हणा

तुमचा

**रामू"**

नारायणरावांनी आपल्या मित्राला तें उत्तर दाखवलें मित्र म्हणाला, "आतां तुम्हीं हा नाद सोडा नारायणराव हीं हल्लीचीं मुल मोठीं हट्टीं 'लव्ह ॲट फर्स्ट साइट' म्हणतात तें कांहीं खोट नाहीं. अगदीं वेडीं होतात तीं या प्रेमाच्या कल्पनेनें. तुमचा रामू सुखरूप आहे यात सारं कांहीं आल. कुठही का असेना ? नाहीं तरी आपल्या प्रपचाला लागल्यावर नेहमीं थोडाच तो तुमच्याजवळ राहाणार आहे ? आतां उगीच काळजी किती दिवस करणार ? "

मित्राचें हें म्हणणें नारायणरावांना थोडेंसें पटलें पण घरांत कोणाला रामूचा विसर थोडाच पडणार होता त्यामुळें ? तेव्हां त्यांनीं ठरवलें कीं एक महिन्याची रजा घ्यावी आणि थोडें तीर्थाटन करावे कालिंदीबाईनाही ती योजना पसंत पडली. नारायणरावानीं रजेकरता अर्ज दिला. आणि रजा मजूर होऊन आल्याबरोबर आपल्या सर्व परिवारासह नाशिकचा रस्ता धरला. पहिले कांहीं दिवस त्यांनीं गंगेच्या कांठावर नुसतेच चिवडा खाऊन रस पिण्यांत घालविले चिवडा, गोलगप्पा आणि भेळ नाशकांत गगेच्या तीरीं फार स्वस्त मिळतात. चिवडा खा खा खाऊन रस पी पी

प्याल्यामुळें नारायणरावाच्या कुटुंबीयांनीं आळीपाळीनें अथरुण धरण्यास प्रारंभ केला. डॉक्टराचें बिल पाहिल्यावर त्याना तीर्थयात्रेची आठवण झाली आणि ते कचाटेशास्त्र्यांच्या कचाट्यात सापडले! ( उपाध्येबोवांच्या ज्या नामावलि तेथें असतात, त्याना 'कचाट' असे विनोदी नाव आहे )

संकल्प, अभिषेक, पिंडदान, श्राद्ध, वायन, उपान्त्यकर्म, ब्राह्मणभोजन इत्यादि धर्मकर्मांच्या पायीं नारायणरावाचा गल्ला खलास होऊन त्याच्यावर कचाट्याकडून कर्ज काढण्याचें कर्म ओढवलें. गंगातट सोडून नारायणरावाना त्याचे उपाध्येबोवा इकडे तिकडे फिरकूंच देईनात.

*   *   *

एक दिवस या साडेसातीला कंटाळून नारायणरावानीं गोष्ट काढली "शास्त्रीबोवा, पांडव लेणीं पहायला जाव म्हणतोय्"

"छे छे छे, महाराज. अहो, राहिलय् काय आतां तिथं? गाढव लेणीं झालींत नुसतीं. उगीच तुमची तंगडीतोड होईल."

"असं का? मग गंगापूर तरी पाहण्यासारख असेल?"

"आहे, पण हल्लीं उडालाय् तिथ प्लेगचा कहर!"

"बाप रे! मग कशाला जा मरायला? त्यापेक्षा आपल भोसला मिलिटरी स्कूलच बरं!"

"पण महाराज, बायकापोराना न्यायची सोय् नाहीं तिथ!"

"कां?"

"तोफा नि बंदुकाचे आवाज कानठळ्या बसतात"

"म्हणजे त्याचा निकाल लागला. बरं, कॉलेज तरी?"

"सुट्टी,—उन्हाळ्याची!"

"रामकृष्ण हरि! मग आपला स्टेशनजवळचा नोटांचा कारखाना नि दारू गाळायची भट्टी तरी पाह्यला मिळेल का!"

"शिव-शिव, अब्रह्मण्यम्!"

"का हो?"

"महार-मांगाचा विटाळ होतो तिथ. वाटेल त्या जातीचे लोक कामाला आहेत ना?"

"बरं चला, तपोवन तर कुठं गेल नाहीं?"

" परवांच्या वळीवान वाघाडीला पूर आलाय् न् त्यान रस्ता बद झालाय् म्हणून तर सारी पचाईत "

असे सर्व प्रश्न निकालात काढून कचाट्यांनी पुन्हा त्या मडळींना तर्पणासाठीं गगेवर नेलें

शेवटीं नारायणरावाना चिरंजिवानीं शिकविलेला धडाच गिरवावा लागला दुगारीं शास्त्रीबोवा वामकुक्षी करीत आहेत असें पाहून नारायणराव चोरपावलांनी बायकोमुलांसह त्याच्या घरातून बाहेर पडले आणि त्यांनीं सरळ तपोवनाचा रस्ता धरला.

बरीचशी भटकपची केल्यावर ती मडळी एका जुनाट खोपटाजवळ येऊन पोंचली. खोपटाजवळ एक पाटी लटकत असून तिच्यावर तीन चार भाषातून पुढील मजकूर रगवलेला दिसला—

प्रभु रामचन्दरजीका निवास

शूर्पणखा वध रामदर्शन.

देखकर पावन हो जाव.

खोपटाच्या दाराशीं एक जटाधारी बोवाजी जपमाळ घेऊन बसले होते. दाढी-मिशांच्या अफाट जगलातून त्याचे बारीक डोळेच तेवढे कलिंगडाच्या बियांसारखे लुकलुकत होते. दर्शनेच्छु मडळी आलेली पाहतांच बोवाजी सामोरे आले आणि त्या जगलांतून आवाज आला,

"दर्शन करो महाराज."

तो जगली महाराजाचा अवतार पाहून मुलें भ्यालीं आणि कालिंदीबाईच्या आड लपू लागलीं. त्याना धीर यावा म्हणून नारायणरावांनीं सभाषण सुरू केले

" ही पुराणातली पर्णकुटीच का ? "

"हॉ जी ; प्रभु रामचन्दरजीका निवासस्थान!" पुन्हा तें दोन पायांचें काळेंपांढरें तपोवन हाललें आणि त्यांतून शब्द उमटले

"पण काका, ही अठरावी पर्णकुटी !" गोप्यानें भीत भीत आपली शका बोलून दाखविली. हेतु हा कीं ह्या 'जगलका शेरा' ला सोडून काकांनीं पुढें चलावें.

"जिकडे तिकडे पर्णकुट्याच." तानीनें पण साथ दिली.

बोवाजींना तें समजलें असावें कारण ते म्हणाले, "नहीं नहीं. बिलकूल झूटी बात. हमारे गुरुजी महत भोलादासको इस कुटीरमें रामचन्दरजीका साक्षात्कार हुवा था."



बोवांचा आवाज तितकासा जंगली नव्हता. निदान धूर खाऊन, गांजा पिऊन गंजलेला तर खासच नव्हता. कालिंदीबाईंनीं ही गोष्ट हळूच नारायणरावांच्या नजरेस आणली. तेव्हां ते म्हणाले,

"खरंच, ब्रह्मचर्याचा परिणाम असावा हा"

"नि त्याची कांति तरी पाहिलीत का किती टवटवीत दिसतेय् ती प्राजक्ताच्या फुलासारखी..."

"पुरे पुरे, आणखी कवित्व नकोस प्रगट करू आपल !"

कालिंदीबाईंना गप्प करून नारायणरावानीं पर्णकुटीच्या उबरठ्यात पाय टाकला तोंच बोवाजींनीं आपला शख तोंडाला लावला आणि दारातच त्याना अडविलें

"धरम करो महाराज !"

"कितना ?" खिशांतला खुर्दा चाळवीत नारायणरावानी विचारलें

"एक शिवराई. ओर इसके उप्पर आप जितना चाहे उतना ..."

एकेक पैशाप्रमाणें हिशोब करून नारायणरावानीं पाच पैसे त्याच्या हातावर ठेवले. पर्णकुटीचें दार उघडून बोवाजींनीं मडळींना आंत जायला वाट करून दिली दार इतकें ठेंगणें व अरुद होतें कीं आंत जातांना कालिंदीबाईंनीं आपल्या धक्क्यानें दाराचा उबरठा पाडला आणि नारायणरावांनीं खांद्यानें एक बाही आडवी केली हा प्रकार पाहून बोवाजींनीं सूचना दिली—

"दिवालको खटो मत—"

"भिंतीला रेटू नका ह..." नारायणरावांनीं लगेच त्याचें भाषातर सांगितलें.

"पुढचा दरवाजा हा ?" कालिंदीबाईंनीं विचारलें, पण आत जातांक्षणीं त्यांच्या लक्षांत आलें कीं पुढचा आणि मागचा दरवाजा तो एकच.

"किती जुनी झोंपडी असेल बरं ही ?"

"एकदम जुनी–सत्ययुग की करामत" बोवाजींनी मोघम सांगितलें

"म्हणजे पांचशें वर्षांपूर्वीची अदाजी ?" नारायणरावांनीं उलटतपासणीनें माहिती काढण्याचा प्रयत्न केला

"छा छा, इतनी नयी कैसी हो सकती ? यहाँ तो रामचदरजी रहते थे ना ?"

"अबब ! तेव्हांपासून हीं काड्यामोड्यांचीं झोपडीं इथें उभी आहेत म्हणतां ? अहो, पेशवाईतले वाडे देखील पडायला लागले आज...."

"वैसी तो है प्रभूकी माया..." बोवाजींनीं दोन्ही हातांचीं दोन बोटें ऊर्ध्व

दिशेला करून आकाशाकडे डोळे लावले.

"खरं आहे काका, वामनपंडितानें म्हटल नाहीं का ? '—महापुरें झाडें जाती तेथें लव्हाळे राहती—' " चि. गोपूनाना बोलले

"अहो शहाणे, ती ओळ तुकारामाची बरं का ?" चि. बापूनानांनीं दुरुस्ती सुचवली.

"मोठीं शहरं नि झाड जिकडे जातात, त्या बाजूला लव्हाळे राहतात." कालिंदीबाईनी केलेली अर्थाची फोड.

"पण ह्या कुटीराची दुरुस्ती वगैरे ?" नारायणरावानी ती काव्यचर्चा बद व्हावी म्हणून सभाषण पुढे सुरू केलें.

"रामदासस्वामी जब यहाँ आयेथे.." बोवाजी सागू लागले

"हू ?"

"तब स्वामीजीनें ये अच्छा करदिया.."

"अग बाई ! रामदासस्वामी पण इथें येऊन राहिले होते कीं काय ?"

"हां हां–दबाके छूप रहते थे इधर..." बोवाजींनीं गुलदस्तातली गोष्ट सागितली

"अय्या..." तानी ओरडली

" म्हणजे, लग्नाच्या बोहल्यावरून सावधान म्हणतांक्षणीं ते जे पळाले, ते इथें येऊन लपून बसले " नारायणरावानीं खुलासा केला

"कोण काका ?" बापू जागा होऊन विचारतो

"रामदास..."

"पण काका, त्याला इथे कसं लपून राहाता आलं ?" गोट्याची शका.

अगदींच खोटी नव्हती त्याची शका पर्णकुटीची पुढची खोली इतकी लहान होती, कीं रामदासासारखी भव्य आकृति येथे बसल्यावर तिच्यातली निम्मी जागा देखील शिल्लक राहाती ना दारांतून कोणीही डोकावलें असतें, तर रामदासस्वामी सहज त्याच्या हातीं लागते. अशा हम रस्त्यावर इतक्या लहान जागेंत लपायला येण्याइतके रामदासस्वामी खुळचट नव्हते हें तर खासच मग हें कसे झालें ?

पण बोवाजींनी ती शका तात्काळ दूर केली. ते म्हणाले, "हा बेटा, बराबर पूछा. लेकिन रामदासजी यहाँ नही छूपे..." त्यानीं भिंतीतल्या एका अधारी कोनाड्याकडे बोट दाखवून सांगितलें, "वहाँ."

"इश्श, एवढ्याशा कोनाड्यांतून तो आत गेला तरी कसा ?" कालिंदीबाई त्या

भगदाडाकडे पाहात म्हणाल्या त्याना वाटलें तें एक बीळच आहे मोठें.

" कोनाडा नही माईजी. हनुमानजी की गुफॉ है बहुत जगा है अदर "

* * *

हें काय नवीन रहस्य, अशा आविर्भावानें नारायणराव त्या गुहेंत डोकावून पाहू लागले तों रामाच्या मूर्तीपुढचा शख उचलून तो बोवाजींनी जोराने फुकला. नारायणराव दचकले आणि पटकन् त्यानी आपलें डोके बाहेर काढून घेतलें. बोवा म्हणतात, -

" हनुमानजीको कोई पैसा देना चाहिये. "

" हट्, आतां कोण देत पैसा ? आपल्याला नको ती हनुमानाची गुहा, नुसता काळोख आहे आत " नारायणराव म्हणाले

" हें काय हो काका, " गोप्या रडका आवाज काढून म्हणाला, " तुम्ही तेवढी पाहिलीत नि आम्हाला कां नाही ? "

" अ अ, आमाला पाह्यची मारुतीची गुहा... " तानीचा सूर.

" बरांय कार्ट्यांनो, ओरडू नका " खिशात हात घालून नारायणरावांनीं मुलांना दटावलें आणि बोवाजीच्या हातावर खुर्दा ठेवला.

पहिल्यानें त्यानीं गोपूला उचलला आणि भगदाडातून त्याला आत कोंबून मारुतीची गुहा दाखविली. आत अधार काळा मिच्च असल्यामुळें वास्तविक गोप्याला कांहींच दिसत नव्हतें. पण कालिंदीबाई त्याला विचारीत होत्या, " दिसल का गोपू? " त्याला तो आपला म्हणत होता, " हो हो, छान आहे. "

पण जेव्हां एक झुरळ उडत येऊन त्याच्या नाकावर बसलें, तेव्हां तो घाबरून ओरडला ! नारायणरावानीं त्याला चटकन् बाहेर ओढला. पण त्या धादलींत त्याची टोपी गुहेंत पडली.

" शूर्पणखा दिसली वाटत मेल्याला ? " कालिंदीबाई म्हणाल्या.

" खरंच, कुणी तरी बाई बसलीय् आत. " गोप्यानें ठोकून दिली.

" नहीं नहीं. शूर्पणखा तो उधर बैठी थी " बाहेर जमिनींत पुरलेल्या एका जात्याच्या तळीकडे बोट दाखवून बोवाजींनीं खुलासा केला.

" और अंदर भी गई थी रामचन्दरजीको वश करने के लिये. " आतां त्यांनीं आंतील खोलीकडे हात दाखविला.

" तेंही बरोबरच ! " नारायणराव म्हणाले, " नाहीं तरी त्या गुहेंतल्या अधारांत

दिसणार कशी ती रामाला काळी कीं गोरी ती ?"

"आणि त्या दगडावर पावल काढलीं आहेत तीं कसलीं ?" कालिंदीबाईनें बाहेरच्या एका खडबडीत दगडाकडे बोट दाखवून विचारलें.

"वहाँ लक्ष्मणजीनें उनको पकडकर ऐसे " बाकीचे शब्द येईनात म्हणून बोवाजींनीं नुसत्याच हस्तविक्षेपानीं शूर्पणखेचें नाक कापल्याचा आविर्भाव व्यक्त केला.

"शेष हस्तविक्षेपेन पूरयेत्" गोव्यानें कोटी केली

"इश्श ! इथेंच का नाक कापल त्या मेलीच ?" कालिंदीबाई शहारे आल्यासारखें करून विचारू लागल्या

"काका, मला दाखवा ना ती गुहा !" तानी अधीर होऊन ओरडू लागली.

लगेच नारायणरावानीं तानीला उचलून भगदाडात खुपसलें तानीच्या आगावर झुरळ आलें नाहीं पण तिला खरोखरीच भास झाला, कीं गुफेंत कोणी तरी बसलेलें असावें त्यामुळें ती दचकली, तेव्हा नारायणरावाना वाटायला लागलें कीं आपणही बघावें थोडे आत डोकावून , परतु तानीला बाहेर काढून पाहातात तों तिच्या तोंडाला खरोखरीच हनुमताची कळा आलेली त्रेतायुगापासून साचत आलेलीं त्या कोनाड्यांतील कोळिष्टके तानीच्या नाकातोंडातून लोंबत होती चेहेरा काळाकुट्ट झाला होता. हा प्रकार पाहून आणखी कोणालाच त्या गुहेंत तोंड घालण्याचा धीर झाला नाहीं.

* * *

झोपडीतल्या इतर वस्तूकडे पाहात कालिंदीबाईंनीं प्रश्न केला.

"जानकी इथेंच राहत होती वाटत ?"

"मेरा बाप मेरा प्रभू! यह कैसा मालुम हुवा आपकू ?" बोवाजींनीं एकदम दचकून विचारलें.

"म्हणजे ? ह्यात काय नवल आहे ? जिथें राम तिथे सीता !"

"हा हा, दाशरथी रामकी सीतामाईजी ?"

"गाजा प्यायलाय् मला वाटत लेकाचा..." नारायणराव एकीकडे पुटपुटले.

"ह" कालिंदीबाई बोवाजींना म्हणाल्या.

"सीतादेवी तो रामचदरजीको यहाँ वनवास कर रही थी !"

"वा:, सीता म्हणजे सिनेमा स्टार समजला का काय हा, रामाला वनवास करायला ?"

"तसं नव्हे" आतां कालिंदीबाईनीं आपला मुद्दा काढला, "जर राम-सीता इथ राहिले नि शूर्पणखेच नाक इथ कापल तर इतक्या लवकर मारुती आला कुठून ही गुहा तयार करायला?"

नारायणराव देखील बुचकळ्यांत पडले पण लगेच त्यांनीं शका काढली, "अः, राम सीतेला घेऊन परत आला तेव्हा मारुतीला ही उकरायची लहर लागली असेल."

"अच्छी बात!" बोवा सुटकेचा एक नि श्वास टाकून म्हणाले आणि लगेच त्यांनीं विषयांतर केलें. "वो देखो पत्थर .. "

पत्थरांना तिथे मुळींच तोटा नव्हता. येथून तेथून सगळे दगडच. नारायणरावांनीं त्यांपैकीं एक कालिंदीबाईना दाखवला. बुवाजीच्या सागण्याप्रमाणें त्या दगडावर सीतामाई आंघोळ करीत. पलीकडे एका कोपऱ्यातल्या दगडावर बसून केस वाळवीत. आंतल्या बाजूस एका मातीच्या ओट्यावर वेणीफणी करीत पलीकडच्या तसल्याच एका मातीच्या मोठ्या चौथऱ्यावर जेवायला बसत सगळीं पुण्यक्षेत्रेंच होती तीं!

भिंतीजवळच्या कट्टयाकडे बोट दाखवून बुवा म्हणाले,

"दुपेरको यहाँ सोती थी–"

"कोण?"

"सीतामाई"

"नि रात्रीं?" गोप्यानें प्रश्न काढला.

"रामचदरजीके..."

"इश्श—काय वात्रट बोलतोय् मेला!" कालिंदीबाईनीं बोवांचीं मुक्ताफळें मध्येच निपटलीं आणि त्या आपल्या मुलाला म्हणाल्या, "चूप रे गोप्या; पुरे कर तुझे फाजील प्रश्न!"

"यह शूर्पणखाका स्थान" बोवाजी आणखी एका चौरस दगडावर उभे राहून म्हणतात, "और यहाँ उसने अपना बाल झटक दिया."

"अय्या, शूर्पणखेला कुठचें बाळ?" तानी ओरडली.

"हँ हँ. समजत नाही तर बोलूं तरी नये..." नारायणरावांनीं तिला दटावले. "अग, इथें तिनें आपले केस झाडून आपटले, असं म्हणतोय् तो."

इतक्यांत गोपूनें कोपऱ्यांतल्या एका लाकडी सांगाड्याकडे बोट दाखवून विचारल, "हें काय?"

"अस्नान का चौरंग है वो."



“ अस्नानका चौरंग है वो. ”

" म्हणजे स्नानाचा चौरंग .. "

" हॉ. बहोत ज्यूना-रामचदरजीके विवाहसमय जनक राजानें उसको नजर किया था " बोवाजी सागू लागले.

" उनका पाँव मुक्ति है. "

" त्याचे चार पाय म्हणजे चार मुक्ति होत्या !" नारायणराव.

" अभी तीन बाकी है एक खतम हुवा ."

" एकाला मुक्ति मिळाली बाकी तीन शिल्लक आहेत. " नारायणराव.

" लेकिन बैठ सकता है आप इनके उप्पर. "

पण तें धाडस करायला कोणीच तयार नव्हतें उलट बराच वेळ गेला असें पाहून कालिंदीबाई म्हणाल्या, " बरं आतां जाऊ या आपण ! "

" अदर देखो. ." बोवाजींनीं आतल्या खोलीकडे बोट दाखवून म्हटलें

" तिथ काय आहे आणखी पाहाण्यासारख ? "

" बहोत है रामचदरजीकी शय्या, सीतारामका प्रतिमा ओर सीतादेवीका चरण...दिल्ली-मथुरासे बडे बडे लोक आते है हमेश इस पवित्र स्थानके वास्ते."

" एवढ पाहिल त्यात हें एक ! " अशी कालिंदीबाईंची समजूत काढून नारायणराव त्या अत.पुराकडे वळले, तों बोवाजीनीं शख वाजवला हा सिग्नल कशाचा तें आतां पक्कें माहीत झाल्यामुळें त्यांनीं एक चवली मुकाट्यानें बोवाजींच्या हातावर काढून ठेवली.

आत चार पांच पायऱ्या उतरून जावें लागलें. तेथील देखावा बाहेरच्या पेक्षां किंचित् अधिक टापटिपीचा दिसला. कोपऱ्यात एक मोडकी तोडकी कॉट दिसत होती. तिचे बहुतेक नवारीचे पट्टे अस्तगत झालेले होते.

" रामचदरजी ओर सीतामाईका ये शयनमदिर. पलगपर सीतादेवीका चरण है. आपको दर्शन हो सकता है. "

" अग बाई ! सीता झोपलेली आहे कीं काय तिथें अजून ? "

" छे छे ! उगीच मूर्खासारखे काय प्रश्न विचारतेस ? चरण म्हणजे पादुका. पलंगावर पादुका ठेवल्या आहेत सीतेच्या "

" इश्श, वनवासात कशाला त्यांना पलग बिलंग ?"

" वा: , कसं केल तरी राजपुत्र होता तो. कुठें गेला तरी बिऱ्हाडबाजलं बरोबर पाहिजेच. साहेब लोक नाहीं का जात शिकारीला रानावनांतून आपल्या खाश्या

स्वाऱ्यांसह ? ”

सीतेच्या पादुकांवर हळदकुंकू वाहण्याकरितां बोवाजींनीं कालिंदीच्या हातांत एक छानदार कुयरी दिली कालिंदीबाई चिमूट भरून तें वाहू लागल्या, तोंच बोवाजींनीं पुन्हा पाचजन्य फुकायला आरंभ केला

“ हा तर लेकाचा त्या कचाव्याचा बापच दिसतो ! ” असें पुटपुटत नारायणरावांनीं चार दिडक्या [illegible] काढून टेवल्या रामचंद्राची ती आधुनिक तऱ्हेची कॉट पाहून त्यानी विचारलें,

“ महाराज त्यांच्या काळी हे असले पलग होते काय ? ”

“ काळी नसले तरी कपाळीं होते खास.” कलिंदीबाई कुजबुजल्या

“ देखो माईजी, ये दुनिया कैसी चलती है ? ”

“ कैसी ? ”

“ ऐसी ” पाण्याचा रहाट फिरवावा तसे हातवारे बुवाजींनीं करून दाखविले.

“ म्हणजे रहाटगाडग्यासारखी ” नारायणराव

“ बीमान तो अब्बी साहेब लोकोने बनाया उससे अच्छा बीमान प्रभु रामचंद्रजीका था ; सच है या नहीं ? ”

“ खर आहे इतिहासाची पुनरावृत्ति अशीच होत असते ”

“ तो पलगकी क्या बात ? सब प्रभूकी माया है ! ” बोवाजींनी सिद्धान्त वाजविला आणि दाढी मोठ्या लाडाने कुरवाळली.

“ गोप्या ऽ ऽ, ही बघ जमत ” तानी कोनाड्यातले कायसेसें उघडून घेऊन म्हणाली. पाहातात तो माकडछाप टूथपावडरीची बाटली !

“ हनुमानजीनें दतधावन बनाया था प्रभु रामचदरजीके लिये.” लगेच बोवाजींनीं खुलासा केला.

“ बरोबर बरोबर ” नारायणराव त्यांना खिजविण्याकरितां म्हणाले

“ म्हणूनच रामाचे दांत पडल्याचा किंवा दुखावल्याचा पुराणांत कोठेंही उल्लेख नाहीं. ”

“ इश्श ! टुथपावडरीचा कारखाना घातला होता वाटतं मारुतीनें ? ”

“ मला पण सापडली एक गम्मत ! ” बापूनाना ओरडले. त्याला एक छानदार कचकड्याचा आंकडा सापडला होता.

“ प्रभु रामचदरजीकी गंध लगानेकी मुद्रा.” बोवाजींनीं त्याचाही इतिहास सांगितला.

बोवाजींची मुद्रा मोठी चमत्कारिक झाली होती. पण त्या केसांच्या जगलांतून त्यांतले कांहीं दिसत नव्हतें म्हणून बरें

"म्हणजे कचकल्याचें काम होत असे त्या वेळीं ?"

"प्रभु रामचदरजीकी माया"

"नि काका, ऽऽऽ हें पाहा काय ?" गोप्याने सूर काढला त्याला एक नाजुक कगवा सापडलेला दिसला

"रामदासजीका" बोवाजीनी जटा विचरण्याचा अभिनय करीत सागितलें आणि आतां अधिक सशोधन पुरे हें सुचवण्याकरिताच की काय, गोग्रासपेटी पुढें केली. आणखी दोनचार दिडक्या गमावून नारायणराव आपल्या कपनीसह एकदाचे बाहेर पडले. जातां जाता देखील एका चोपड्या दगडाची बोवाजीनीं "शूर्पणखेची पाठ" केल्यामुळें दोन दिडक्या त्यांना फेकाव्या लागल्याच.

रस्त्याला वळण होतें तें ओलाडून मडळी दहावीस पावलें चालून जातात तों त्यांना दुसरी एक झोपडी दिसली. थेट पहिलीची नक्कल. झोपडीवर लटकणारी पाटीही तशीच

पर्णकुटी —प्रभु रामचद्रजीका निवास.

शूर्पणखावध देखकर पवित्र हो जाव

एकूण येथे रामदर्शनच काय ते कमी होतें. झोपडीच्या दारात एक दाढी-मिशावाला बैरागी आपली जपमाळ घेऊन बसलेला दिसलाच. मंडळींना पाहातांच त्यानें पुढे येऊन विचारलें,

"दर्शन करो महाराज. हरद्वारसे भी अधिक पुण्य संपादन हो जायगा."

"आपण रस्ता चुकलों काका ! पुन्हा माग चाललों." गोप्या म्हणाला.

नारायणरावांनाही तसेंच वाटायला लागलें. "हो, नाहीं तर मयसभेसारख हें एखादं इद्रजाल तरी असल पाहिजे." असे उद्गार काढून ते तोंड फिरवून चालू लागले; पण थोडे मागें जातात तों पुन्हा तीच पर्ण-कुटी, तिच्यावरची तशीच पाटी आणि दारात मघाचे तेच बोवाजी जपमाळ घेऊन बसलेले ! हा काय चमत्कार ?

"नाहीं काका, ती दुसरी झोपडी आहे तिच्यांत रामदर्शन नाही." गोप्यानें नेमकी गोम शोधून काढली आणि त्या कोड्याचा उलगडा केला.

तो प्रकार पाहातांच नारायणरावांची सत्यप्रीति उचंबळून आली आणि आपला स्वतःचा धर्मभोळेपणा ते घटकाभर विसरले. पुराणाच्या नावावर भाविक लोकाना

ठकविणाऱ्या बैराग्यांची ही ठकबाजी चवाठ्यावर मांडायला ही एक बरी संधी मिळाली असे त्यांना वाटूं लागलें

" अरे हूर म गोरानो, असे फसवतां काय लोकांना ? " ते दुसऱ्या बैराग्याला म्हणाले.

" कोन फसाता है ? ओ साला फसाता है ! " त्याचें उत्तर.

" रामायणकी पर्णकुटी हमारी है गुरु भोलादासजीको साक्षात्कार हुवा था ! " पहिल्या बैराग्याचें समर्थन

" महाराज, चार महिना भी नही है इधर वो भंगड. " दुसरा बैरागी.

" अरे भगडदास, किसकू बोलते तुम भगड ? " पहिला बैरागी.

" हमारी पर्णकुटी खुद रामचदरजीनें अपने हाथसे बनाया, आप रामायण पढेंगें तो उसमें ये पर्णकुटीका स्थान दिया है वो आपको मालूम पडेगा ! " दुसरा बैरागी.

" झूट कहता है उसकी पर्णकुटी वाल्मीकि रामायणकी और हमारी आनंद रामायणकी मेरे गुरु महत भोलादासनें बताया " पहिला बैरागी

" किसकू झूट कहता है रे बदमाष ? अभी तो आया तपोबनमें और मिजास कितनी दिखाता है ! " दुसरा बैरागी

आणि ते चांगलेच हमरीतुमरीवर आले. नारायणरावानी झाली इतकी शोभा पुरे म्हणून तेथून पाय काढला

" इतिहासाची पुनरावृत्ति होते खरीच ! " कालिंदीबाई म्हणाल्या

" म्हणजे ? " नारायणराव खेकसले.

कारण ते आतां " मूड " मध्यें नव्हते.

" न-नाहीं .एका पर्णकुटीमागून दुसरी पाहिली म्हणून म्हटलें ! "

" विनोद करण्यासारखा विषय नाहीं हा भोळ्या हिंदु लोकांच्या डोळ्यांना न दिसणारीं लाछनं आहेत हीं, समजलीस ! तें काही नाहीं ; ही असली बुवाबाजी उखडून काढलीच पाहिजे. "

" उगीच कशाला बाई घालायची डोक्यांत राख ती ! कोण पाहायला गेलंय् खरं कुठचं नि खोटं कुठच तें ? आपण शुद्ध भावनेनें पाहातों ना ? मग झालं तर. त्यांचं पाप त्यांच्यापाशीं ! "

परंतु नारायणरावांचें थोडेंच अशानं समाधान होणार ? ह्या महा ठकांनीं आपल्या भाविकपणाचा फायदा घेऊन आपल्यालाही बनवलं ह्याचाच त्यांना

बिलक्षण संताप आलेला होता व त्याची आग त्यांच्या मनांत चांगली चार पांच दिवस धुमसत राहिली

* * *

आपल्या गांवीं आल्याबरोबर, ह्या ढोंगबाजीबद्दल एक झणझणीत लेख लिहून तो "किर्लोस्कर" कडे पाठवावा असे त्याच्या मनात आले थोडा विचार केल्यावर ते कागदपेन्सिल घेऊन लिहायलाही बसले पण एक ताव पुरा झाला असेल नसेल इतक्यांत त्याच्या नावाचें एक नॉटपेड पत्र आले त्यांनी ते घेतलें नसतेंच पण पाकिटाच्या डावीकडील कोपऱ्यात पाहातात तों, "राम रबडे यांजकडून" असा मजकूर !

पाकिटावर नाशकाचा शिक्का होता. तो पाहून त्याना विस्मय वाटलाच पण आंतलें पत्र वाचून पाहिल्यावर तर त्याच्या आश्चर्याला पारावारच राहिला नाहीं. होताच तसा तो मजकूर विलक्षण !

"साष्टाग नमस्कार वि. वि

तीन-चार दिवसामागे आपली भेट झाली अशी अचानक होईलसें वाटलें नव्हते ! पण झाली हें उत्तम झालें. माझी पर्णकुटी माझें पोट कशी भरीत आहे तें आपल्याला त्यामुळें प्रत्यक्ष पाहायला सापडलें. आपण आपल्या हातानें त्या दिवशीं मला पांच आणे दिलेत. आपल्यापेक्षाही मूर्ख लोक येथें रोज किती तरी येऊन जातात. त्यामुळें माझा प्रपच छान चाललाय्

प्रपंच म्हणायचें कारण असें कीं मधून मधून मला येथें जानकी जगदाळे भेटते. कित्येक वेळा आम्ही दोघही येथेच राहातों तिच्याशीं लग्न लावण्याचा माझा विचार कायम झालेला आहे दोन दिवसांनीं रजिस्टर करू व मग जमेल तेव्हां आपल्या आशीर्वादाकरिता येऊं.

दुसरें चरितार्थाचें साधन मिळेपर्यंत हाच धंदा करायचा माझा विचार आहे. आपण दूरदृष्टि ठेवून त्याला आड येणार नाहीं अशी आशा आहे. माझ्यासारखीच दुसरी पर्णकुटी पाहून इतकें बिथरून जायला नको होतें तुम्हीं. आमच्या या तपोवनात तुम्हांला पदोपदीं इतिहासाची पुनरावृत्ति झालेली दिसेल. पुराणें तरी काय थोडीं आहेत का आपल्यांत ?

आईला नमस्कार. मुलांना आशीर्वाद. गोप्याला म्हणावें, आपल्या वहिनीचा

कंगवा मोठ्या चलाखीनें खिशांत घालून नेला आहेस, तो आठवण म्हणून जपून ठेव. कळावें,हुंडी विनंति

आपला

**रामू "**

( रघुवीरदास गुरु भोलादास )

नारायणराव असे चरफडले की ज्याचें नाव तें पण त्यानीं पत्राचा चोळामोळा केला का ? मुळीच नाही. उलट लेखाचा बोळा करून तो त्यांनीं खिडकीच्या बाहेर फेकून दिला आणि उड्या मारीत ते सौ ला चि. रामूचें पत्र दाखवायला गेले.




त्या दिवशीं रा. ब तात्यासाहेब किलबिले भल्या पहाटे उठले आणि गडबडीनें आन्हिक उरकून बाहेर पडले वायफळवाडींतला प्रत्येक चौक त्यांनीं धुंडाळला. “काय लेकाचे ! एरवीं पांच नाहीं वाजले तों गांवभर ठणाणा करीत सुटतात, नि आजच कुठें पडले गाजा पिऊन ?” असें आपल्याशींच ते पुटपुटत आहेत तोंच त्यांना वर्तमानपत्रें विकणारा एक पोरगा भेटला त्याच्याकडून “काकध्वनि” पत्राचा ताजा अक विकत घेऊन ते तडक घरीं आले.

इदिराबाई घरांत चहाच्या तयारीत असाव्या; कारण स्टोशीं त्यांची झटापट चालली होती.

“ हं, पाहा ह्यांत काय गमत आली आहे ती !” असें मोठ्या विनयाचा आव आणून तात्यासाहेब म्हणाले आणि पत्नीच्या पुढ्यांत तो अक टाकून “ अजि सुदिन उगवला ” ह्या गाण्याची शीळ घालीत झोपाळ्यावर बसले.

इंदिराबाई अक उघडून उत्सुकतेनें वाचू लागल्या.

“ इश्श ! ह्यांत कसली गंमत ? गडहिंगलजला म्हणे घुशींचा सुळसुळाट !”

“ तें नाहीं ग ; त्याच्या खालीं बघ. ”

“ कणकवलींत भर दिवसा विद्यार्थिनीचा विनयभंग ! विनयभंग म्हणजे काय ?”

“ डोचकं तुझं. तुला तें कुणीं वाचायला सांगितलं ? पुढच्या कॉलमांत पाहा. ”

“ उर्ध्वगमन हेंच रूप बरोबर ! अहो हा शाब्दिक वाद संपायचा तरी केव्हां ?”

“ तो लेखक ऊर्ध्वगमन करील तेव्हां. पण तें जाऊं दे.”

" मग काय गमत राहिली आतां ?"

" आहाहाहा, अग पुढच्या कॉलमांत एवढा ढळढळीत फोटो नाहीं का दिसत तुला ?"

" हू."

" कुणाचा आहे तो फोटो ?"

" असेल एखाद्या वळूचा. अलीकडे बैलांचे फोटो यायला लागलेत वर्तमानपत्रांत. पोळाच चाललाय् मेल्यांचा तिन्ही त्रिकाळ"

" छान बैलाचा फोटो ! अग जरा नीट पाहा, प्रत्यक्ष आपल्या नवऱ्याची नाहीं का ओळख पटत ?"

" इश्श, आपला का हा ?" इदिराबाईंनीं तो फोटो त्यांच्या तोंडासमोर धरून विचारलें. तात्यासाहेब पाहातात तों खरेंच फोटो शाईनें इतका लडबडलेला होता, कीं माणूस आहे कीं बैल हें सहज ओळखता येऊ नये

" काय कराव ह्या अच्युतला ?" रावबहादुर त्रासून म्हणाले.

" कोण अच्युत ?"

" अग ढोल्यांचा अच्युत काकध्वनीचा संपादक आहे तो. आपल्याजवळ ब्लॉक चांगला नव्हता तर गाढवानें सांगायच तरी ! नवीन काढून दिला असता मीं !"

" हो, द्याल तर काय झाल, फोटोला पैसे आहेत तुमच्याजवळ नि माझ्या पातळाच्या वेळीं मात्र पगारांतली काट पुढें यायची."

" अः ! पातळ नेहमीचींच आहेत. पण अशी ही संधि येईल का पुन्हा ? अग, हा फोटो कितीही काळा असला, तरी तो पाहिल्यावर ढवळ्याच्या नानाचे डोळे कसे पांढरे होतील, माहीत आहे ?"

"अग बाई ! झाली का पुन्हा तुमची लठ्ठालठ्ठी सुरू ?"

" जरा फोटोच्या खालीं नजर टाक म्हणजे समजेल तुला !"

इंदिराबाई वाचतात, "वायफळवाडीतील काहीं ऐतिहासिक व्यक्ति ? लेखांक ला . . रा. ब. तात्यासाहेब किलबिले !"

" कां, कशी केली ?" रावबहादुरांनीं एक मोठा झोका घेऊन विचारलें, ह्या लेखमालेंत अग्रपूजेचा मान आम्हांला मिळाला कीं नाहीं ?"

" आणि नानासाहेब ?"

" अं· तो येईल केव्हां तरी खोगीरभरतींत. उगीच लेकाचा स्वतःला वायफळवाडीचा वॉशिंग्टन समजतो ! आतां पाहा म्हणाव डोळे उघडून, वॉशिंग्टन आहेस का नुसता

वाशा आहेस तें. तुझा बाप इथें वायफळवाडींतच आहे लेका!"

"अहो, पण ते म्युनिसिपालिटीचे अध्यक्ष आहेत ना? नि आपण तर त्यांच्या विरुद्ध उभे राहून पडलांत सपशेल!"

"हे! म्युनिसिपालिटीचा अध्यक्ष होणं म्हणजे कांहीं मोठा पराक्रम नव्हे. मोफत वाचनालयाचा चिटणीस नि कमिटीचा अध्यक्ष दोन्ही सारखेच. मेंबरांना चारलान् मलिदा नि झाला अध्यक्ष, दुसरं काय?"

"पण त्याला अगोदर मेंबर म्हणून निवडून यावं लागत ना?"

"निवडणूक कसली ती! सारी गफलतीची धामधूम कोण जातो ते धंदे करायला? त्यापेक्षां ऑ. मॅजिस्ट्रेट म्हणून सरकारची ही कामगिरी इमानानें केलेली बरी!"

यजमानाचा फोटो आणि त्याना ह्या प्रसिद्ध व्यक्तीच्या लेखमालेंत मिळालेले अग्रस्थान पाहून इंदिराबाईचीही कळी खुलली त्यानीं आपली सर्व करामत खर्च करून फक्कडसा चहा बनवला आणि तो - - - - पुढें ठेवीत त्या म्हणाल्या, "असो. आता तरी लोकांना कळून येईल खरं नाणं कोणत ते. निवडणुकीच्या वेळीं भाळले मेले त्या नानासाहेबाच्या भुलथापाना. कोळशातल माणिक होत म्हणाव हें. उगीच नाहीं त्या संपादकाला एवढा शहाणपणा सुचला!"

"तुम्हीं बायका भारी भोळ्या बुवा. अग, त्या संपादकाला आपोआप का हा शहाणपणा सुचला आहे? छे, पुष्कळ हिकमती कराव्या लागल्या त्याकरतां!"

"हिकमती?"

"सांगतों ऐक." रावबहादुर चहाचे भुरके घेता घेता बोलूं लागले, "अच्युत ढोले परवां माझ्याकडे आला होता."

"अग बाई! आपली मुलाखत घ्यायला कीं काय?"

"तसंच काही नाहीं अगदीं. मुलाखत घ्यायची होतीच. पण काकध्वनीचे तुम्ही वर्गणीदार व्हा म्हणूनही सांगायचं होत मी म्हटलं, "तुमच्या पत्रांत हल्लीं वाचण्यासारखा मजकूरच नसतो" तेव्हां तो म्हणाला, "तात्यासाहेब, आमची नवी लेखमाला पुढच्या अंकापासून सुरू होणार आहे. ती वाचलीत म्हणजे तुमचं हें मत बदलेल."

"कोणची लेखमाला?" मीं विचारलें.

"वायफळवाडींतील ऐतिहासिक व्यक्ति!" त्यानें सांगितलं.

"अस्सं, एकूण आतां जरा रियालिस्टिक टच देणार म्हणतां तुमच्या शंखध्वनीला?"

" शंखध्वनि नव्हे, तात्यासाहेब, काकध्वनि ! "

" समज्या हो कल्पना चागली आहे तुमची. पण असं पाहा, जरा जपूनच लिहा त्यांतला मजकूर. हो, त्यांत व्यक्तिविषयक बरंचस असणार, तेव्हां आपल अंग चोरून लिहिलेल बरं हो, त्याचा काय नेम सागावा, आमचाही समावेश व्हायचा एखाद वेळेला तुमच्या ह्या लेखमालेंत ! "

" पण... "

" बाकी आमच सार्वजनिक आयुष्य म्हणजे काय, उघड पानच आहे. त्यांत लप्प छप्प काही नाहीं, काय समजलात ? "

" पण तात्यासाहेब वर्गणीदाराशिवाय ...... "

" अ , त्याची नका करूं काळजी अच्युत. आजच वर्गणीदार झालों समजा. "

" अग बाई ! " इदराबाई म्हणाल्या, " घातलेतच का त्याच्या डोंबलावर चार रुपये ? "

" ऐक ग " तात्यासाहेब आपल्याच तोऱ्यात म्हणाले, खरी गमत पुढेंच आहे. अच्युतच्या हातावर ते रुपये चमकू लागताच स्वारी हसत हसत म्हणाली,

" थॅंक्स, तात्यासाहेब ! मग आपली काही हरकत नसेल, तर लेखमालेत घेतों आपल्याला हो, थोडा करमणुकीचा भाग हवाच तिच्यात. नाहीं तर कंटाळवाणी व्हायची आपल स्वभावचित्र म्हणजे काय, एक विनोदभाडारच आहे ! "

" छे छे अच्युत, अहो तुम्हीं हें सीरियस्लीच घेतलत की. उगीच मीं आपली जराशी थट्टा केली ! "

" वा, अस कस तात्यासाहेब ? वायफळवाडींत आपली गणना .. "

" कसच कसच, लोकांची आपली समजूत आहे झाल कांहीं तरी ! "

" कांहीं तरी कशी ? आपलं कार्यच इतकं मोठं ... "

" छे हो. मी काय करणार बापडा ? कर्ता करविता तो परमेश्वर. बरं आतां आग्रहच आहे तुमचा, तर होऊ द्या एकदा तुमच्या मनासारखं. पण काय हो, लेखाचा क्रम कसा काय ठेवलाय् ? "

" त-तसा क—कांहीं ठराविक क्रम नाहीं. पण सात आठ लेख अगोदरच कंपोज होऊन पडलेत.... "

" पडूं द्यात ते तसेच. "

" म्हणजे ? छापखान्याजवळ टाइप फारसा नाहीं रावबहादुर.... "

" म्हणून आमचा नववा नंबर लावणार कीं काय ? भले म्हणजे [illegible] व्यंगचित्र दाखविणार म्हणा ना. "

" प...पण..."

" पण बीण कांहीं नाहीं. आमच्याविषयीं लेख द्यायचा असेल, तर तो पहिला यायला पाहिजे."

" विचार करून ठरवतों."

" विचार ? अहो हा काय तुम्ही अविचार समजतां कीं काय ?"

" तसं नव्हे तात्यासाहेब ; इतर संपादकांपुढं आपल म्हणणं ठेवाव लागेल."

" कां ?"

" पहिला लेख अगोदर ठरवून टाकलाय् त्यानीं. नवीन अकाची मॅटर् जुळवायला आरंभही झाला असेल एव्हांना.. "

" कोण हा पहिला बाजीराव ? "

" नानासाहेब ढवळे..."

" कोण ? तो बावळ्या ? "

" बावळे नाहीं, ढवळे "

" हो हो समजलं. अहो सपादक, वेड तर नाहीं लागल तुम्हाला ? ह्या वायफळवाडींत पहिला मान देण्यासारखी त्या बावळट ढवळ्याखेरीज दुसरी व्यक्ति आढळली नाहीं तुम्हांला ? वायफळवाडींतलीं सारीं वजनदार माणसं मेलीं कीं काय ?"

" न-नाहीं. त्या दृष्टीनें आपल्यालाच पहिलं स्थान द्यायला हव तात्यासाहेब ; पण..." माझ्या भव्य देहाकडे पाहात तो चाचरू लागला.

" पण काय ? संपादक आहांत कीं भंपकराव नुसते ? तुमच्यासारख्यांनीं त्या कवडी किंमतीच्या माणसाची जाहिरात करायला लेखणी हातीं घ्यावी म्हणजे संपादकीय धद्याचा शुद्ध अपमान आहे बरं अच्युत त्यापेक्षां हातांत झाडू घेतला असतात तर फुकटचे ॲसेंब्लींत निवडून तरी आलां असतात. अच्युत कसचे तुम्हीं ! आम्हीं आतां तुम्हांला पदच्युत ढोले म्हणणार !"

" आपली मर्जी. निनांवी पत्रांतून ह्याहीपेक्षा इरसाल शिव्या आम्हांला खाव्याच लागतात. पण वर्तमानपत्राच्या सांपत्तिक स्थितीकडे डोळेझाक करून चालत नाहीं आम्हांला. सध्यांच्या चढाओढीच्या काळांत एवढं मोठं साप्ताहिक चालवणं हें किती दुर्घट होऊन बसलंय् !"

" तो मंत्र तोंडपाठ आहे आमच्या ! पुढें बोला. "

" नानासाहेब ढवळे कसे केलें तरी आज म्युनिसिपालिटीचे अध्यक्ष आहेत, आज काल पुढारी म्हणून त्यांचच नांव सगळ्याच्या तोंडीं आहे !"

" अ , लोकांना रोज नवीन जिन्नस तोंडीं लावायला लागतो लोकांचं नका सांगूं. "

" तें खरं आहे. नानासाहेबावाचून आज एकाही संस्थेच पान हलत नाहीं. मग त्यांच्यावाचून काकध्वनीच तरी कस चालणार ? "

तो लेकाचा नानासाहेबाचे एवढे गोडवे गायला लागला, तेव्हां त्यांतलं इंगित माझ्या एकदम लक्षात आल मीं त्याला सरळच प्रश्न केला,

" त्याच्याकडून लांच किती घेतलीत तें बोला अच्युत ! "

" शिव शिव शिव ! रावबहादुर, असल अपकृत्य आम्हांला ठाऊक नाहीं. नानासाहेबानीं आपल्या म्युनिसिपालिटीच्या शाळांकरितां काकध्वनीच्या दीडशें प्रती घ्यायचं कबूल केलय् ह्यापेक्षां दुसरी कुठलीच चिरीमिरी..."

" आणखी निराळी चिरीमिरी कशाला घ्याल ? "

" प्रसार हें वर्तमानपत्राच मुख्य आग आहे. प्रचार मागाहून. तेव्हां दीडशें प्रतींचा उठाव आम्हाला बराच उठावदार वाटतो. त्याला नाइलाज आहे तात्यासाहेब "

" आता आली लक्षांत आपली हिकमत !" इदिराबाई चिडून म्हणाल्या, " आपण पाचशें प्रती घेतों म्हणून सांगितल कीं काय त्या मेल्याला ? "

" छट् ! इतका कांहीं मी भोळा साब नाहीं ; आपल्या अनाथ पंगु गृहांत वांटायला फक्त तीनशेच प्रतीचा मीं सौदा केलाय्. पण तेवढयावर अच्युत एवढा खूष होऊन गेला, की ढवळ्याची गॅली मोडलीन् ताबडतोब. "

" अगोऽबाई, आणखी मोडतोड कसली ही ? "

" तसं नव्हे ग त्याच्या लेखाचा टाइप उसकटून माझ्या लेखाला खर्च केला. "

" काय ग बाई प्रसिद्धीचा सोस हा ? कोळशातल माणिक कसलं ? सोसमावसा म्हणतील लोकं. ह्यापेक्षां सरळ जाहिरातच का नाहीं दिलीत ज्ञानप्रकाशांत त्या क्रुशेनबाबासारखी ? "

" हें बघ, तुला ह्यातलं काही कळायचं नाहीं. प्रेम आणि प्रसिद्धी ह्यांत सर्व गुन्हे माफ असतात असा नवीन नियम काढलाय् मीं !" असें म्हणून तात्यासाहेब उठले आणि खिडकीपाशीं उभे राहून त्यांनीं रस्त्याकडे आपली नजर लावली.

" काय पाहतां एवढं ? तीनशें प्रतींच्या गठ्ठयाची का वाट पाहातां ? "

" छे ग, ढवळे दिसतो का तें पाहातों. आपल्याच मनोराज्यांत दग असेल बेटा अक विकत घ्यायला आता बाहेर पडेल बघ मोठ्या थाटानें माझ्या मनांत आहे· दिसला तर चहाला म्हणून हाक मारावी. चहाचे भुरके मारायला लागला, कीं ठेवावा तो काकध्वनि त्याच्यापुढें. कॅमेरा तयार करून ठेव तुझा. "

" कॅमेरा ? कॅमेरा कशाला ? "

" त्याचा फोटो काढायला " रावबहादुर आपल्या ओठावरच्या पारंब्यांना हिसके देत म्हणाले, "आमचा लेखाक नबर एक पाहिल्यावर त्याचा चेहेरा पाहाण्यालायक नाहीं का होणार ? "

" उगीच का एखाद्याच्या मार्गे लागाव अस ? "

" भली खोड मोडेल गुलामाची. लाडूबहादुर म्हणतो काय मला ? "

थोड्या वेळानें नानासाहेब ढवळे खरोखरीच रस्त्यानें जातांना दिसले. त्याबरोबर तात्यासाहेबानीं काकध्वनीचा अक टेबलावर पसरून ठेवला अशा तऱ्हेनें, कीं त्या लेखावर नानासाहेबाची सहज नजर जावी. नतर खोलीत जरा टापटीप करून त्यांनीं इंदिराबाईंना पुन्हा चहा टाकण्याचा हुकूम दिला आणि खिडकीतून ते नानासाहेबाना हाका मारू लागले.

" माफ करा तात्यासाहेब, आतां जरा गडबड आहे " नानासाहेब झपझप पावलें टाकीत म्हणाले.

" जाल हो पांच मिनिटांनीं. या जरा. चहा घेऊ ! "

" तेवढा मॉर्निंग पेपर घेतों नि मग. . "

" आमचा आलेला आहे तोच हवा तर न्या "

नको नको करीतच नानासाहेब आंत आले जरा इकडच्या तिकडच्या गप्पा होतात तों चहा आला. चहा घेतां घेता नानासाहेबाचे लक्ष टेबलावरच्या काकध्वनीकडे गेलेंच. आता त्यांच्या चेहेऱ्यावरील देखावे कसकसे बदलतात ते पाहाण्याकरिता तात्यासाहेबांनीं खिडकीवरचा पडदा मुद्दामच बाजूला सारला.

काकध्वनीकडे लक्ष टाकलें न टाकलेंसें करून नानासाहेबांनीं प्रश्न केला,

" तुम्हीं हें पत्र घेतां वाटतं ? "

" नेमानें नाहीं. पण घेतों झालं कधीं कधीं ! "

" मग आज काहीं विशेष ? "

" न-नाहीं बुवा फारस. त्या काजीपुऱ्यात ड्रेनेज् फुटलंय् म्हणे गेल्या चार पांच

दिवसांपासून ! ”

“ चार-पाच दिवस कुठल ? काल दुपारीच तर ती कुडी तुंबली. आज साफ सुद्धा झाली असेल. ”

“ शुक्रवारात रात्रीं दिवेच लागत नाहीत आताशा ! ”

रावबहादुर मुद्दामच ही उडवाउडवी करीत होते. हेतु हा की नानासाहेबांनीं आपण होऊनच अक उचलून पाहावा

“ दिवे लावणारे लोक हल्ली शुक्रवारांत जातच नाहीसे झाले की काय ? ”

“ कुणाला ठाऊक ? ”

“ बरं, आणखी काही कमजास्त ? ”

“ आणखी काय असायच ? गावात म्युनिसिपालिटीचे दिवेच नसले, तर लिहायला सापडणारच काय ह्या सपादकाला ? ” तात्यासाहेबानी टोमणा दिला.

“ तसं नव्हे, पण अच्युत म्हणत होता की आजपासून कसलीशी नवीन लेखमाला सुरू व्हायची आहे ! ”

“ लेखमाला ? ती कसली बुवा ? ” रावबहादुरानी जणू काय आपण त्या गांवचेही नाही, असा आव आणून विचारलें

“ वायफळवाडींतल्या काही मोठ्या लोकाच्या मुलाखती यायच्या होत्या म्हणें त्या मालेंत ”

“ हा हा, तें होय ? आहे खर तसल काही तरी इथल्या एका प्रसिद्ध व्यक्तीचं त्रोटक चरित्र नि फोटो बिटो छापलेला दिसतोय् खरा ”

“ अरे वा, फोटो देखील आलाय् का ? मग पाहिलाच पाहिजे मला. या लोकांना फोटो मुळींच छापता येत नाहींत. पाहू बर आमच्या चेहेऱ्यापैकीं काय काय शिल्लक ठेवलय् ते ? ”

“ पाहा की. ” रावबहादुरानीं मानभावीपणानें अक पुढें केला अक वाचल्यावर नानासाहेबांचा चेहेरा फोटोपेक्षांही कसा काळा ठिक्कर पडेल हें मनात येऊन त्यांना थोड्या गुदगुल्या झाल्या. इतका सपशेल तोंडघशीं पडायला नको होता बिचारा, असा थोडा सहानुभूतीचा विचारही त्यांच्या मनांत येऊन गेला.

नानासाहेबांनीं अक उघडला आणि त्यावरून ते अधाशासारखी दृष्टि फिरवू लागले. पाहाता पाहातां त्यांना हवा असलेला मजकूर सापडला. तो ते बारकाईनें वाचू लागले.

जरा वेळ वाचल्यानंतर वर्तमानपत्र तोंडासमोरून बाजूस करून ते म्हणाले,

" मजकूर बरा लिहिलाय्, पण फोटो अगदीं गचाळ ! " ' काय बेरकी आहे, ' रावबहादुर मनातल्या मनात उद्गारले. पण उघड मात्र त्यांनीं ठोकून दिलें, " चुकलच तें. त्याला फोटो नवीनच काढून द्यायला हवा होता "

त्यांना वाटलें, नानासाहेब आपल्याच फोटोला नाके मुरडीत असावेत !

" आयत्या वेळेला कसा मिळणार फोटो ? नि त्यांतून हे पावसाचे दिवस चांगला कसलेला फोटोग्राफर गारठून जातो ह्या हवेंत, मग त्या भिरग्याची काय दशा ! सपादकाचा तर असा लकडा, की पठाण पुरवला त्यापेक्षां शेवटीं जो होता तोच दिला झाल ! "

" फोटो तुमचाच आहे ना पण ? " रावबहादुरांनी खोचून पण हसत प्रश्न केला

" फोटोचं एक राहू द्या, " त्यांचा टोला न समजून नानासाहेब म्हणाले, " पण ह्यांत पतांच्या पागेच प्रकरण यायला हव होत सविस्तर "

" पंतांची पागा ? " रावबहादुरांनीं चमकून विचारले

" अहो, आपल्या जाफरतलावाकरतां कमिटीनें घेतली ना ती ? केवढ्या भानगडी झाल्या त्या वेळी ! केवढा दगा गावात ! कर्फ्यू ऑर्डरपर्यंत पाळी आली होती एवढी गाजलेली ती पताची पागा ! "

" पण इथें काय तिचा संबध ? " रावबहादुरांनीं गोंधळून जाऊन प्रश्न केला, " ते प्रकरण झाल तेव्हां तर मी मसुरीला होतों ! आमच्या छबीकरतां हवापालट करायला नव्हतों का गेलों ? तेव्हा माझा काय सबध आला त्या प्रकरणाशी ? "

" तुमच्याबद्दल नाहीं म्हणत मी. माझ्याबद्दल सागतोंय् जाफर तलावाच वर्णन ढीग केलंय् ह्या अच्युतनें पण त्या तलावाच्या जन्माच्या वेळी हें पागा प्रकरण इतक गाजल असूनही त्याचा उल्लेख नाहीं ओझरता "

आतां मात्र रावबहादूर गडगडले ! त्यानीं स्वतः तयार केलेल्या आपल्या लेखांत म्युनिसिपालिटीच्या जाफरतलावाचा कोठेंच उल्लेख नव्हता. मग त्या तलावाच वर्णन त्यात कोठून आल ? हा नानासाहेब ढोंग तर करीत नाहीं ना सगळ ? कोण कुणाला बनवतो आहे खरोखरी ? ह्या प्रश्नानी त्यांच्या डोक्यांत गोंधळ उडवून दिला. शेवटीं राहावेना तेव्हां,

" म्हणतां तरी काय तुम्हीं ? " असें बोलत त्यांनीं नानासाहेबाच्या हातांतून काकध्वनीचा अक हिसकून घेतला आणि आपण लेख नीट वाचलाच नसावा अशा समजुतीनें ते पुन्हा, ' वायफळवाडींतील ऐतिहासिक व्यक्ति, लेखाक पहिला:— रावबहादुर तात्यासाहेब किलबिले ' ह्या मथळ्याखालचा मजकूर पाहूं लागले. तो

मजकूर वास्तविक तिसऱ्या पानावर होता. "मग हा नानासाहेब मघांपासून पहिल्याच पानावर काय डोंबल पाहातो." असें पुटपुटत ते पान उलटणार तोंच समोरच्या फोटोकडे त्यांची नजर गेली. पाहातात तों काय! त्याच्या फोटोच्या चौपट आकाराचें-नानासाहेबांचें मोठें चित्र, आणि त्याखाली जाड्या टाइपात मजकूर,

"[illegible] विक्रम. लेखांक पहिला.—दे. भ नानासाहेब ढवळे!"

रावबहादुरांचे डोळे विस्फारले. त्या ठळक मथळ्याखाली संपादकानीं जवळ जवळ चार स्तंभ मजकूर ढवळ्यांच्या गुणगौरवानें भरून काढलेला होता. त्याचे सार्वजनिक आयुष्यांतील अनेक पराक्रम मधून मधून बारीकसे पोटमथळे घालून रंगविलेले होते! रावबहादुर सर्द झाले.

ह्या मजकुराच्या मानानें पाहातां तिसऱ्या पानावरच्या लेखमालेंतील त्यांचा स्वत:चा लेख कात्री लावून संपादकानें इतका छुटक केला होता, कीं तें एखादें-हावेरी-बेट्गिरीचें बातमीपत्र असावें असें पाहाणारास वाटावें. त्यांतून लेख अशा तऱ्हेनें कातरला होता, कीं राहिलेल्या मजकुराला एखाद्या विनोदी चुटक्याचें स्वरूप आलें होतें. दोन निराळ्या लेखमाला एकाच वेळीं सुरू करण्याची त्या संपादकाची ही ठकबाजी पाहून रावबहादुर इतके स्तंभित झाले, की आपल्या खोलींतून नानासाहेब ढवळ्यांनीं तोंडाला उपरणें लावीत केव्हां सूबाल्या केला तें त्यांच्या लक्षांतही आलें नाहीं.

आणि माणसाच्या मनात एकदा शंकाकुशंका यायला लागल्या, कीं सारें जगच उलटे चालतें असा भास होतो. तद्वतच काकध्वनीच्या चौथ्या पानावर जबुसरला बक्षीस दिला गेलेल्या एका वळू बैलाचा फोटो जेव्हां त्यानीं पाहिला, तेव्हां तो आपल्या फोटोच्या मापाचाच आहे असें त्यांना वाटायला लागलें. आणि ही म्हणाली त्याप्रमाणें त्याच फोटोला जास्त शाई लडफडवून ढोल्यानें आपल्याला ह्याही बाबतींत बनविलें नसेल ना अशी त्याना हुरहुर वाटूं लागली. संपादकीय पेंढारीपणाचा त्यांना इतका सताप आला, की त्यानीं त्या क्षणीं हातांतल्या काकध्वनीचा रागारागानें चोळामोळा केला आणि आता ते तो खिडकीबाहेर फेकणार इतक्यांत ढोल्यांकडील इसम तीनशें काकध्वनींचा गठ्ठा खाद्यावर घेऊन आला! आदबीनें एक पाकीट तात्यासाहेबाच्या हातीं ढकलीत तो म्हणाला, "ढोलेसाहेबांनीं बिल दिलंय् हें!"

त्याच वेळीं इंदिराबाई खरोखरीच कॅमेरा घेऊन खोलींत प्रवेश करत्या झाल्या; पण रावबहादुराची ती विलक्षण चर्या पाहातांच कॅमेरा आपल्या हातांत असून आतां कळ दाबायचाच काय तो अवकाश आहे, याचें त्यांना भानही राहिलें नाहीं!




त्याच वेळीं इंदिराबाई खरोखरीच कॅमेरा घेऊन खोलींत प्रवेश करत्या झाल्या.




म्हणतात ना, माणसाच्या व्यसनाशी समरस झाल्याखेरीज त्याची खरी ओळख व्हायची नाहीं गोपूकाकाची तीच गोष्ट !

गावाच्या बाहेर टुमदार बगला भोवती सुदरसा बगिचा. घरात नोकर चाकर, आधुनिक सुखसाधनाची रेलचेल, मोटार, विजेचे पखे, सर्व काहीं ! एखाद्या अमलदाराला शोभेसा गोपूकाकाच्या राहाण्याचा रुबाब होता मध्यप्रातांत मोठ्या हुद्द्यावर काम केलें होतें ‘साहेबानी’ ! त्यांची आकृतीही दिसायला भव्य आणि रुबाबदार असे. त्याच्याशीं बोलणारा परका मनुष्य जरासा भीतीनें गागरूनच जायचा. ह्या सेवानिवृत्त आयुष्यात काका इतके कडक ; मग अधिकारावर असताना केवढी मिजास असेल त्याची ? परंतु हेच कर्दनकाळ गोपूकाका त्यांच्या खाजगी खोलींत कसे वागत असतील ह्याची इतर लोकांना काय कल्पना ?

ह्या विसगतीचे कारण काकाचे व्यसन हरएक प्रकारच्या गूढविद्येचा काकांना अतोनात नाद त्याच्या खाजगी खोलींत तुम्हीं डोकावून पाहिलेंत तर पुढील प्रकारचा देखावा बहुतकरून तुमच्या नजरेस येईल

खोलीच्या मध्यभागीं सारवलेल्या जमिनीवर मृगाजिन आंथरलेलें. त्याभोवती रागोळी, समोर उदबत्त्या, आजूबाजूला गूढ विद्याग्रथ, एका पाटावर फुलें आणि पूजेचे साहित्य.

मृगाजिनावर गोपूकाका बसलेले, डोक्याला धोतर गुडाळलेलें असून आंगावर फक्त उपरणें. कानावर दर्ग्यांतील फकिराप्रमाणें दोन उदबत्त्या खोचलेल्या ; ध्यानस्थ मूर्तिप्रमाणें डोळयांच्या पापण्या खालीं पडलेल्या खिडक्यांवर ओढलेल्या

पडद्याप्रमाणें दिसायच्या त्या

गोपूकाकांच्या समोर एक पाट त्याच्यावर कागद पसरलेला असून गोपूकाका त्या कागदावर प्लँचेट फिरवीत बसलेले असायचे. कितीही प्रयत्न केला तरी प्लँचेट कांहीं केल्या त्याच्या हातानें हालायचें नाहीं. शेवटीं,

" नर्मदा, अग नमू, नमू अ . " गोपूकाकानी हाक मारावी, त्यांच्या मुलीनें एक गोडशी 'ओ ' द्यावी आणि लगेच खोलींत प्रवेश करावा.

" बस खालीं " असें म्हणून काकानीं नर्मदेच्या हाताखालीं प्लँचेट द्यावें आणि फर्मान सोडावें, " ह, डोळे मीट आणि कुलदेवतेचं स्मरण कर ! "

बिचाऱ्या नमूनें डोळे मिटावेत आणि उगीचच कांहीं तरी पुटपुटावें !

" कल्लाप्पा ! अहो कल्लाप्पा, कल्लाप्पा ! " गोपूकाकानीं हाका माराव्या. नर्मदेला हसू लोटावें. परंतु बापाच्या भीतीने ते दाबीत तिनें जेमतेम प्लँचेटवर बोटे कायम ठेवावीं. हो ! सोळा सतरा वर्षांच्या ऐन उमेदीतली पोर ती. त्यातून मॅट्रिकचा उबरठा ओलाडून पुढे गेलेली. तिचा विश्वास काकाच्या ह्या गूढ विद्येवर कसा बसावा ? परंतु तिच्या काकांपुढें वादविवाद करण्याची सोय नव्हती सगळें ' हुडेल हप ' काम असायचें ! प्लँचेट फिरवतांना नुसते हसलें तर काका आकाशपाताळ एक करायचे !

' कल्लाप्पा 'ला हाका मारून भागत नाहीं असें पाहून गोपूकाकांनी चबूसारखें तोंड करावें आणि हातांचा ' फोनो ' करून प्लँचेटजवळ, ' श्री गुरुदेऽऽव दत्त श्री गुरुदेव दत्त ! जय अघोर घट ; जय कपालकुडला, आस्तिक आस्तिक ' वगैरे ठराविक मंत्रोच्चार करावा. प्लॅचेटवरून नीरांजन आणि उदबत्ती ओवाळावी साळीच्या लाह्या टाकाव्या आणि पुन्हा कल्लाप्पाला आवाहन करावें इतकें झाल्यावर प्लॅचेट फिरू लागलें तर ठीक, नाहीं तर नमूचें मरण ओढवलेंच म्हणून समजावे.

' तूं आज स्नानच केल नसशील ! ' ' आज महाराला शिवून आली आहेस ' ' देवळात वहाणा घालून गेलीस बहुतेक. ' किंवा कांहींच न सापडलें तर, ' अपवित्र विचार येताहेत तुझ्या मनांत ! ' असें बोलून त्यांनीं तिला त्राहि भगवान् करावें.

बरें प्लँचेट चालू झालें तर गोपूकाका मृतात्म्याशीं संभाषण करण्यांत इतके गढून जायचे कीं बिचाऱ्या नमूला चार चार तास एका जागेवर बसून प्लँचेटवर बोटें ठेवावीं लागत. पेन्सिलीनें उत्तरें खरडलेल्या कागदांचा सभोवार मोठा ढीग पडे.

' कल्लाप्पा ' हा गोपूकाकांच्या हपिसात एक हेड कारकून असून दहा वर्षांपूर्वीच

मयत झालेला होता. त्याच्यावर काकांची विशेष मर्जी असल्यामुळेंच की काय, कल्लाप्पाचा मृतात्मा त्याच्या हाकेसरशी प्लँचेटवर धावत येई. अर्थात् त्याच्यावर काकांचा फार भरंवसा दुकानदार ज्याप्रमाणें सकाळीं दुकान उघडतांच 'बोहोनी' करायला पैशाची खडीसाखर आपल्या रतिबाच्या गिऱ्हाईकाला विकतो त्याप्रमाणें प्लँचेटवर कल्लाप्पा येतांच पुढील संवाद व्हायचा.

"काय कल्लाप्पा, तुम्ही आलात का ?"

"होय !" प्लँचेट घुरु घुरु फिरे आणि वेडी वाकडी अक्षरें खालील कागदावर उठत.

"काय करतां तुम्ही ?" ओळख पटण्यासाठीं काकांचा खुणेचा प्रश्न.

"मिशा साफ" कल्लाप्पांचें उत्तर लिहून यायचें. ह्यात असतांना कल्लाप्पांना मिशातील केर वारंवार झटकून टाकण्याची लकब होती अर्थात् मेल्यावर त्याच्या लिंग देहाला तो चाळा असणारच.

"हें पाहा कल्लाप्पा, तुमच्याजवळ आणखी कोण कोण आहेत ?"

"स्वामीसाहेब" हे हपिसांतील गोस्वामी नावाचे थोरले साहेब असून ते कल्लाप्पांच्या अगोदर दिवगत झालेले होते.

"आमची ही आहे का तिथे जवळपास ?"

"कोण ?"

"खाय् शिंनळीच नांव घ्याव लागत. अहो, राधा ?"

"हो, आहेत" तपासाअंतीं कल्लाप्पांचे उत्तर यावें

"हें पाहा कल्लाप्पा, तुम्ही जा आता नि हिला द्या पाठवून लवकर" कसलेल्या सूत्रधाराप्रमाणें काका फर्मान सोडीत.

वरिष्ठ साहेबांचा हा हुकूम कल्लाप्पाच्या लिंग देहानें शिरसावंद्य करावा आणि प्लँचेटवर गोपूकाकांच्या सौ. ला पाठवून द्यावें. मग त्याचें 'तिच्या' बरोबर हितगुज सुरू व्हावें आणि तो नवरा-बायकोचा संवाद नर्मदा डुलक्या घेऊं लागेपर्यंत आटपू नये !

नर्मदा ही गोपूकाकांची हक्काची 'मीडियम्' होती खरी, पण ती हुकमी नव्हती. म्हणजे कधीं तिच्या हातून तें प्लँचेट भराभरा चाले तर कधीं तें जागचें हालत नसे. ज्या दिवशीं तें हालायचें नाहीं तो दिवस दोघांनाही वाईट जायचा. काकांचा वैताग आणि तिची रडकुंडी

'माझ्यावरचा साहेब मरून मला बढती केव्हां मिळेल ?' 'नर्मदेचं लग्न केव्हां -

जमेल ?' ह्या महत्त्वाच्या प्रश्नांपासून तों तह्त 'घरांतले उंदीर केव्हां नाहींसे होतील ?' अगर 'आज केलेल्या जोड्यांच्या सौद्यांत मी फसलों तर नाहीं ना ?' असले खुळचट प्रश्न गोपूकाकांच्या प्लँचेटवरील संभाषणांत येत असत. त्याचप्रमाणें प्रश्नाला योग्य असा मृतात्मा बोलावून घेण्यांत ते वाकबगार असत. उदाहरणार्थ वर दिलेल्या प्रश्नांपैकीं पहिल्यासाठीं ते आपल्या आवडत्या 'किंखेड' साहेबांना पाचारण करीत. दुसरा प्रश्न ते भास्कराचार्यांना विचारीत. तिसऱ्याकरिता ते सुप्रसिद्ध रॅंडसाहेबाला हाका मारीत, तर जोड्यांचा सौदा कै. बाटलीवाला ह्यांच्यावर सोपवीत. अशा तऱ्हेनें गोपूकाकांचें प्लँचेट त्यांच्या कुटुंबाचा एक जिव्हाळ्याचा सोबती ह्या नात्यानेंच काय परंतु सर्व गांवाचा सल्लागार ह्या व्यापक स्वरूपानें विख्यात झालें होतें. प्लँचेटविरुद्ध कोणीं ब्र काढलेला खपायचा नाहीं त्यांना.

कॉलेजांतील एका तरुणाशीं नर्मदेची अलीकडेच ओळख होत होती. कारण प्रभाकर हा कॉलेज–समेलनाचा जनरल सेक्रेटरी तर ही त्याच कमिटीवर लेडीज रेप्रेझेंटेटिव्ह ! असें नातें जमल्यामुळें साहजिकच संमेलन होऊन जाईपर्यंत दोघांच्या बऱ्याच भेटीगांठी झाल्या. प्रभाकर तसा मुलींत लुडबुडणारा फडतुस प्राणी नव्हता. हुषार असून चांगला पट्टीचा वक्ता होता. दिसायला देखणा आणि खेळांत प्रवीण असल्यामुळें कॉलेजांत ज्याच्या त्याच्या तोंडीं त्याचे नांव ऐकू यायचें. मग नर्मदेच्या दृष्टीनें तो मैत्री करण्यास लायक ठरल्यास नवल कसलें ? एक प्रभाकर और सब चक्कर, अशी तिची स्थिति होऊन गेली. तिला ध्यानीं मनीं प्रभाकर दिसूं लागला.

अशा प्रसंगीं जी गोष्ट करण्याचें बरेच तरुण टाळतात ती करण्याचें प्रभाकरनें धाडस केलें. तिच्या वडिलांना तो भेटला आणि तिच्याबद्दल आपल्याला काय वाटतें हें त्यानें गोपूकाकांना स्पष्टपणें सांगून टाकलें. म्हाताऱ्याच्या आंगाला रागानें कांप सुटला. प्रभाकरला खाऊं कीं गिळूं असें त्यांना होऊन गेलें. आपल्या मुलीवर कोणी प्रेम करीत आहे असें कळलें म्हणजे सगळ्याच मुलींच्या बापांना असें फेपरें येतें कीं काय कोणास ठाऊक ?

पण गोपूकाका एकदम रागाच्या आधीन झाले नाहींत. तसें पाहिलें तर नर्मदेकरितां स्थळें पाहाण्यास त्यांनीं आरंभही केला होता. आपल्या प्लँचेटची त्यांना आठवण झाली. गुरुमाउलीचा सल्ला घेतल्याशिवाय दारीं चालून आलेल्या उपवर ब्रह्मचाला अगदींच हुडूत करणें बरें नव्हे, असा शहाणपणाचा विचार त्यांच्या

डोक्यांत आला. त्यांनीं प्रभाकरची हजेरी घेतली, पण आपलें घर त्याला बंद केलें नाहीं.

त्या दिवशीं संध्याकाळीं प्रभा नर्मदेला भेटला त्याचें तोंड उतरलेलें दिसलें. भावि आयुष्याच्या क्षितिजावर त्यांना काळे ढग जमतांना दिसू लागले. त्याच्या आड नर्मदेसारखी तारका आतां अदृश्य होणार हें दुश्चिन्ह दोघांनाही खिन्न करण्यास पुरेसें होतें. तिला वाईट वाटलें, नव्हे, डोळ्यांना पाणीदेखील आलें, परंतु तिनें अजिबात धीर सोडला नाहीं. आपल्या वडिलांच्या खुळाचा योग्य तो फायदा करून घेण्याचें तिनें ठरवलें आणि तें कसें जमेल ह्यावर विचार करीत ती घरीं परतली.

संध्याकाळीं तिला गोपूकाकांनीं प्लँचेटवर बसवलें. नेहमींप्रमाणें कल्पपांची हजिरी लागल्यावर 'तिला' बोलावण्यात आलें इकडच्या तिकडच्या गप्पा झाल्यावर काकांनीं मुद्द्याची गोष्ट काढली.

"काय ग," त्यांनीं विचारलें, "आपल्या नर्मदेचं यदा लग्न करायच कीं नाहीं?"

नर्मदा ह्याच संधीची वाट पाहात असावी कारण हा प्रश्न ऐकतांच एकाएकीं हुरूप येऊन ती गालांतल्या गालात हसली आणि गभीर मुद्रा करून तिनें हलक्या हातांनीं प्लॅंचेट फिरवलें. कागदावर उत्तर उमटलें, "घाई नाहीं. स्थळ मनाजोगतं मिळालं तर कराव. नाहीं तर पुढच्या वर्षी!"

उत्तर वाचून जरा बुचकळ्यांत पडल्यामुळें काकांनीं पुढील प्रश्न केला, "तें बरोबर. तिच्या कॉलेजांत एक प्रभाकर म्हात्रे नांवाचा विद्यार्थी आहे घरचा खाऊन पिऊन सुखी आहे. त्या लेकाच नर्मदेवर प्रेम बसलय् तो होऊनच विचारीत होता म्हणून समजल मला. मग सांग हा मुलगा कसा काय वाटतो तुला?"

"नमूच प्रेम असलं तर ठीक आहे." प्लॅंचेटनें ताबडतोब उत्तर दिलें.

"काय म्हणतेस? ह्या पोरांचा हा चवचालपणा खपतो तुला? कॉलेजांत शिकायच सोडून चावटपणा करणारा हा कार्टा पुढें काय दिवे लावणार बरं?"

"चावट नाहीं धाडशी आहे. प्रामाणिक वाटतो. नर्मदेला चालत असला तर जावई करून घ्यावा."

प्लॅंचेट आज अस्खलित चालत होतें. आपल्याला मनांतून नको असलेलीं उत्तरें नेमकीं भराभर येत आहेत हें पाहून काका दिङ्मूढ झाले. जराशी कडवट चर्या करून त्यांनीं प्रश्न विचारणें बंद केलें आणि प्लॅंचेट एका रेशमी बासनांत गुंडाळून ठेवलें. प्रतिकूल उत्तरामुळें जरी त्यांना वैषम्य वाटलें तरी एकीकडे भरपूर अभिमानही

वाटत होता आपलें ब्लॅचेट आतां अडत नाहीं ; आपण आतां साऱ्या भूतपिशाच्चांचे सम्राटच झालों, असे आत्मप्रौढीचे विचारही त्यांच्या डोक्यांत येऊन गेले

. . . . . पुढील घटना अवलबून असल्यामुळें ते अगदींच निराश झाले नाहींत. हो, प्रभाकरचं ढीग असेल तिच्यावर प्रेम, परंतु तिला तो आवडला पाहिजे ना ? आणि आपली लेक असल्या चारगटाला कसली भाळणार ? तिनें पाहिले असतील असले छप्पन्न प्रभाकर अशी त्यांची विचारमालिका धावत सुटली

"काय ग नमू ," गोपूकाकानीं तिच्या पाठीवरून ममतेनें हात फिरवीत विचारलें, "कॉलेजांत अलीकडे बऱ्याच उलाढाल्या करतेस म्हणे ? "

"कुठें हो काका ? काहीं तरी तुमच !" नर्मदेनें काकांच्या उपरण्याशीं खेळत उडवाउडवी चालवली.

"काहीं तरीच कसं ? चांगल्या चागल्या विद्यार्थ्यांबरोबर ओळख झालीयू तुझी. खरं कीं नाहीं ?"

"होय. पण मी संमेलनाच्या कमिटींत काम करीत होते म्हणून त्यांची ओळख झाली इतकच मी आपण होऊन नव्हते हो गेलें कुणाशीं मैत्री करायला !"

"त्याची ? ते कोण ?"

"आहेत एक म्हात्रे म्हणून "

"अस्सं. प्रभाकर म्हात्रेच कीं नाहीं ?"

"अय्या ! काका तुम्हांला कस माहीत ?" तिनें अगदीं नैसर्गिक रीत्या आश्चर्य प्रगट करून विचारलें.

"माझ्याकडे आला होता तो तुला वाटत तो साधा भोळा आहे. खुळी ग खुळी. पक्का बेरड आहे तो नमे !"

"अग बाई. केल तरी काय त्यांनीं असं ?" तिनें घाबरून विचारलें

"आणखी काय करायच राहिल आहे ?" रागाचा आविर्भाव आणून काका गरजले, "बेशरमपणान तुला मागणी घातली. हरामखोरान लग्न करणार म्हणे हा भामटा तुझ्याशीं ! वा, खाशी सोय !"

एकंदर बतावणी छान रंगवली आणि लेकीलाही यथास्थित चेतवलें असें गोपूकाकांना समाधान वाटू लागलें. विजयी मुद्रेनें आपल्या कुंचलीवजा मिशांना पीळ देण्याचा प्रयत्न करीत ते तिच्या उत्तराची वाट पाहूं लागले.

"इश्श ! काका, हें हो काय ? इतके कांहीं वाईट नाहींत हो ते. त्यांनीं आपला

आशय प्रांजलपणानें बोलून दाखवला, यांत काय अपराध झाला त्यांचा ?"

मिशीवरचा हात खालीं आला. डोळ्यांच्या कवड्या झाल्या, 'आ' वासून ते तिच्याकडे पाहू लागले. ही माझीच का लेक ? असा प्रश्न जणू काय ते आपल्या मनाला विचारीत असावेत. त्याच्या रुद्रावतारामुळें जराशी भ्यालेली नर्मदा मान खालीं घालून पायाच्या आंगठ्यानें जमीन उकरू लागली. काकाही आपल्या निजायच्या खोलीकडे तरा तरा चालते झाले

दुसऱ्या दिवशी काकांनी विचारलेल्या प्रश्नाची हकिगत प्रभाकराला नर्मदेच्या तोंडून ऐकावयास मिळाली प्लँचेट आणि त्यावर आपण केलेली शिताफी ह्याविषयीं मात्र तिनें अवाक्षर काढलें नाहीं, कारण असल्या खुळचट गोष्टीची तो लागलीच भवेरी उडवायचा हें तिला माहीत होतें. पुढची मोहीम फत्ते होण्यास काय करावें ह्याबद्दल दोघांची बरीच चर्चा झाली शेवटीं जाता जाता तिनें सूचना केली, "किनई प्रभा, तुझ्याविषयीं काकाचा ग्रह चागला होण्यासारखी एखादी गोष्ट घडली तर जिंकली समज."

आता अरे जारे म्हणण्यापर्यंत दोघाची गट्टी जमली होती. तिच्या ह्या सूचनेचा विचार करीत प्रभाकरानें घरचा रस्ता धरला.

एक दिवस आनंदमदिरांत कोणाचेंसें 'मरणोत्तर जीवाचें अस्तित्व' ह्या जाडजूड विषयावर व्याख्यान होतें. व्याख्यानाला अध्यक्ष गोपूकाका असून, व्याख्यानानंतर उपवक्त्यांना बोलण्याची मुभा होती हें प्रभाच्या दृष्टीनें महत्त्वाचें होतें. विषय भलताच भारदस्त असल्यामुळें त्यावर त्याला फारसें पांडित्य प्रगट करतां येणें शक्य नव्हतें. परंतु आलेली सधी दवडणें बरें नाहीं असा विचार करून सुचतील ते चार शब्द गोपूकाकांच्या समोर व्यासपीठावरून बोलायचे असा त्यानें निर्धार केला. आपली वक्तृत्वशैली पाहून काका खूष झाल्याशिवाय राहाणार नाहींत असा त्याला आत्मविश्वास होता ही संधी ज्याअर्थी इतक्या लवकर मिळत आहे त्या अर्थी ह्या कामीं आपणावर दैवाची कृपा आहे आणि म्हणून पुढें सर्व कांहीं शुभमगलच होणार ह्या मनोराज्यांत स्वारी दंग होऊन गेली.

आणि आनदमंदिरांत खरोखरीच त्या दिवशी त्यानें न भूतो न भविष्यति असें भाषण केलें. तो विषय जसा कांहीं नेहमींच त्याच्या डोळ्यांसमोर असावा आणि आतां संधी मिळतांच "सुड सुड" करीत त्यावर त्यानें तुटून पडावें असा त्याचा एकंदर आवेश होता. टाळ्यांचा प्रचंड गजर करून श्रोतृवर्गानें त्याच्या विचारांचें कौतुक

केलें. विचार कसले ? बॉबगोळेच ते. मुख्य वक्त्याच्या सिद्धान्ताच्या त्या फैरीनें त्यांनीं चिंधड्या उडवल्या !

पण ..पण नर्मदेनें एकही टाळी वाजवली नाहीं. उलट सुतकी चेहेरा करून "सगळा सत्यानाश झाला" असें दर्शवीत ती खालीं मान घालून स्त्रियांच्या समुदायांत स्वस्थ बसली होती. आपल्या यशानें तिला आनंद वाटेल ; तिचें मोकळें अल्लड मन आपले विचार ऐकून उचबळून येईल म्हणून त्यानें मोठ्या आशेनें, ती बसली होती तिकडे, दहा पांच वेळां तरी पाहिलें असेल. परंतु शेवटपर्यंत तिनें मान वर केली नाहीं, आनंदाचा लवलेशही दाखवला नाहीं मग टाळी कोठून वाजवणार ?

नर्मदा असें कां करते ह्याचा त्याला उलगडा होईना. व्याख्यान आटोपल्यावर तरी ती आपलें अभिनंदन करायला येईल म्हणून सभागृह रिकामें होईपर्यंत तो दरवाजांत घुटमळत होता. वेडी आशाच ती ! श्रोतृवृन्दाच्या टाळ्याची त्याला दिक्कत नव्हती. पण तिनें एक बारीकशी स्मिताची छटा तोंडावर आणून जरी 'छान झाल' हे दोन शब्द म्हटले असते तरी त्याला अस्मान ठेंगणें वाटलें असतें. परंतु सारी आशा फोल ठरली.

सर्व माणसें निघून गेल्यावर गोपूकाकांचे हारतुरे घेऊन ती एकदाची गाडींत बसण्यासाठीं आली. अतिशय उत्कंठेने त्यानें विचारलें, "कसं झाल व्याख्यान नमू ? आवडल का तुला ?" ह्यावर नमू कांही बोलणार इतक्यांत मागून गोपूकाकांची गर्जना झाली,

"खबरदार नर्मदे त्या कार्ट्याला जबाब देशील तर !" त्याबरोबर दचकून तिनें तोंड फिरवलें. बकोट धरून जवळ जवळ फरफटत काकांनीं तिला गाडींत बसवलें. प्रभाकरचा विरस झाला. वाईट तोंड करून त्यानें विचारलें,

"कांहीं प्रमाद घडला काकासाहेब माझ्या हातून ?"

"करून सवरून वरतीं हा बेशरमपणा. छे छे छे ! तुम्ही तरुण पोरांनीं अलीकडे बेछूट धर्मलंडपणा आरंभला आहे. नास्तिकपणा तर तुमच्या पांचवीला पुजलेला. नाहीं आचार, नाहीं विचार. तोंडाला येईल तें बहकत सुटायचं. तुमचे बापजादे सांगून गेले तें सगळ खोटं. त्यांनीं तपच्या तपं अभ्यास करून लिहून ठेवलेला तो कचरा ! शिव शिव ! तुमच्या सावलीला उभं राहाणं नको. तुम्हांला कशाबद्दल आदर मुळीं नाहींच. सगळ्याचीच कुचेष्टा. शहाण्या सुस्वभावी पोरींना नवमताच्या नांवाखालीं भुरळ पाडून त्यांच्या जन्माचं वाटोळं करायला तेवढे तयार..." काका एकसारखे गर्जत होते.

त्या सरबत्तीनें प्रभाकर घायाळ झाला. आपलें काय चुकलें हेंच त्याच्या लक्षांत येईना. गोपूकाकांच्या गैरसमजुतीचें निरसन करण्याकरितां त्याचें तोंड उघडण्याचे आधींच गाडीचें दार खाड्दिशीं लावलें गेलें आणि गाडी भुर्रकन् निघून गेली सुद्धा! तिच्या पाठीमागच्या तांबड्या दिव्याकडे शून्य दृष्टीनें पाहात तो किती तरी वेळ वेड्यामारखा तेथेच उभा होता. आपण आपल्या व्याख्यानात प्लँचेटवर तोंडसुख घेतल्यामुळें गोपूकाकांच्या पोटातील सुरुगाला बत्ती लागली हें इंगित त्याच्या कोठून लक्षात येणार?

नर्मदेला मात्र अद्याप एक आशेचा किरण दिसत होता. घरीं गेल्यावर गोपूकाका पुन्हा आपल्या आईला प्लँचेटवर बोलावतील, प्रभाकरबद्दल बोलणें निघेल आणि आपण मागच्याप्रमाणेंच चलाखी करून काकांच्या रागाचा पारा उतरवू अशी तिची कल्पना होती. परंतु ती चुकीची ठरली. त्या रात्रीं काका प्लँचेटला शिवले नाहींत. उलट त्यांनीं नर्मदेला मात्र स्पष्ट बजावलें,

"याद राख पुन्हा त्या कार्ट्याच्या वाऱ्याला उभी राहिलीस तर!"

आपण काकाऱ्यावर इंप्रेशन मारण्यासाठीं करायला गेलों एक आणि हें काय झालें भलतेंच हें गूढ प्रभाकरला कांहीं केल्या उमजेना. नर्मदेची गांठ रोज एकदा तरी व्हायची तेव्हा तिच्याकडून खुलासा होण्याची आशा होती. पण तीही फोल ठरली. तिचें भेटणें बद झालें. ह्यामुळें प्रभाकरच्या मनाची फार चमत्कारिक स्थिति झाली.

चार पांच दिवसानतरची गोष्ट. गोपूकाका नदीकांठावर फिरायला गेले होते. गांवांतील पेन्शनर मंडळीचे संध्याकाळचें हें आवडतें ठिकाण होते. साधारणपणें सहा वाजल्यापासून नऊ वाजेपर्यंत तेथें सारखी ये जा चाललेली असायची. ओळखीची मडळी भेटली म्हणजे घटकान् घटका अड्डा मांडून चकाट्या पिटीत बसायची. सगळ्या गावच्या चौकशा व्हायच्या. निरनिराळ्या सरकारी खात्यांच्या कारभारावर टीका व्हायची. हा साहेब कोठें जातो, त्याची बायको कशी पळून गेली, त्या साहेबाला पिण्याचा फार नाद! आमचा साहेब मोठा खाष्ट; तुमचा फार दिलदार! अशा तऱ्हेनें हपिसांतल्या यच्चयावत् साहेबांचा समाचार घेतला जायचा कोठल्या विषयापासून चर्चेला आरंभ होईल आणि शेवटीं मंडळी वाहावत कोठल्या विषयापर्यंत जातील ह्याचा कांहीं नेम नसे.

आज बोलतां बोलतां भविष्य-वादावर चर्चा सुरु झाली. नंतर मृतात्म्याबद्दल प्रश्न निघाला. त्याचप्रमाणें माध्यम (मीडियम्) कसें असावें ह्यावर खडाजंगी वाद झाला. प्रत्येकजण आपआपल्या अनुभवाच्या जोरावर स्वतःचें तट्टू दामटण्याचा प्रयत्न करीत

होता. विसूनाना म्हणाले, "कांही म्हणा गोपूकाका. तुम्हीं पुष्कळ जरी अनुभव घेतला असला तरी वामनराव म्हाम्र्यांची काहीं सर यायची नाहीं त्याला!"

"कां?"

"वामनराव वाटेल तेव्हा, वाटेल त्या ठिकाणीं नि वाटेल त्या तऱ्हेनें मृतात्म्याशी बोलू शकतात. त्यांनीं विचारलेल्या प्रश्नाच उत्तर चुकीचं आल आहे अस कधीं होतच नाहीं. हा माझा त्यांच्या बाबतींत बोवा असा अनुभव आहे."

"खरं आहे. वामनरावांना ती एक सिद्धीच आहे म्हणतात." दाजीबांनीं विसूनानांना दुजोरा दिला.

"कांहीं तरी बोलतां झालं!" गोपूकाकांनीं दोघांनाही हिणवलें.

"आम्हांला काय करायचं आहे कांहीं तरी सांगून? अनुभव आला तो सागितला." दाजीबांनी स्वत चें समर्थन केलें.

"आज पंचवीस वर्षं मी ह्या विद्येचा अभ्यास करीत आहें," काकांनीं प्रौढी मिरवली, "मला नाहीं वाटत माझ्याइतका कुणाचा प्लॅंचेटवर ताबा असेलस"

"तीच तर मौज आहे. वामनरावांना प्लॅंचेटदेखील लागत नाहीं."

"म्हणतां काय? प्लॅंचेटशिवाय मृतात्म्यांशीं सवाद?" काकांनीं आश्चर्यानें विचारलें, "तबकडीशिवाय फोनोवर गाण ऐकण्यासारखच आहे हें."

"स्टो चालतो त्यांना!" दाजीबांनीं ठोकून दिलें

"स्टो? दाजीबा, शुद्धीवर आहांत का? चहा नाहीं करायचा मृतात्म्याशीं संभाषण म्हणजे!"

"चहा नाहीं हो. स्टो काहीं पेटवायचा नाहीं. स्टो ठेवायचा पाटावर. मीडियमनें त्याला नुसता हात लावायचा आणि वामनरावानीं प्रश्न विचारायचे. प्रत्येक प्रश्नाच्या उत्तरादाखल स्टो आपोआप ठोके मारतो. एक ठोका म्हणजे अ, दोन जलद ठोके म्हणजे ई, दोन दीर्घ ठोके म्हणजे क. अशी त्या ठोक्यांची गुप्त लिपी आहे; समजलांत?"

गोपूकाका घाम टिपू लागले. गेल्या पचवीस वर्षांत असला चमत्कार त्यांनीं कधींही ऐकला नव्हता. निर्जीव भिंत चालवणारे ज्ञानेश्वर महाराज आणि स्टोला आपोआप उड्या मारायला लावणारे वामनराव ह्या एकाच रांगेंत बसण्यासारख्या विभूति होत असें त्याना वाटूं लागलें. वामनरावाविषयीं त्यांच्या मनांत भलतेंच कुतूहल उत्पन्न झालें. आपण इतके दिवस प्लॅंचेट फिरवतों आणि गूढविद्येचा गर्व

वाहातों तें फुकट! स्टोला नाचवणारा हा वामनराव गूढविद्याशास्त्रांतला शंकराचार्यच म्हटला पाहिजे; असे विचार गोपूकाकांच्या डोक्यांत येऊं लागले. वामनरावांविषयीं पहिल्यानें जी असूया त्यांच्या मनात उत्पन्न झाली होती ती कोठच्या कोठें पळाली.

"वामनरावांच मीडियम् कोणत ?" त्यांनीं अगत्यानें विचारलें.

"त्याचा मुलगा प्रभाकर!" दाजीबांनी सागितलें.

"कोण? तो धर्मलंड कार्टा?" गोपूकाका उद्गारले.

"होय. तो स्टो चालवतो नि पुन्हा अगदीं हुकमी त्याच बोट लागायचा अवकाश कीं स्टो नाचत सुटतो एखाद्या मोरासारखा! कितीही जलद सभाषण करा, उत्तर बिचूनक."

"अहो पण परवां तो कार्टा भरसभेंत ह्या शास्त्राबद्दल नाहीं नाही तें बोलला. टर उडवली गाढवानें गूढविद्येची!" काकानी शका काढली

"तें कांहीं आपल्याला ठाऊक नाही परंतु प्रभाकरच्या हातून कधीं स्टो चालला नाहीं असं घडल नाहीं"

हा नवीन प्रकार ऐकून काका भ्रमिष्ट स्थितींतच आपल्या घरी गेले

ज्या वामनरावाबद्दल त्यांना रात्रभर स्वप्नें पडत होतीं तेच गृहस्थ दुसऱ्या दिवशीं उजाडत गोपूकाकाना भेटायला आले. हा अकल्पित योगायोग पाहून काकांचा वामनरावानीं आपल्या कामाचा लवकरच खुलासा केला. त्यांनीं गंभीर स्वरानें विचारलें,

"आपली मुलगी नर्मदा लग्नाची आहे?"

"होय!" काकांनीं आदबीने उत्तर दिलें

"श्रीहरि!" भाविकपणे गुरुमाउलीचें स्मरण करून वामनराव उद्गारले, "अनताची लीला अगाध आहे. आपल्या कन्येला मी आपली सून करून घ्यावी अशी 'तिची' आज्ञा झाली आहे! म्हणून प्रत्यक्ष बोलण करण्याकरितां मी आज आलों."

"पण...पण, आपल्या मंडळींनीं आमच्या नर्मदेला कधींही पाहिलेलं नाहीं." गोपूकाका चाचरत म्हणाले.

"वायुरूप झालेल्या 'तिच्या' देहाला सारं ब्रम्हांड दिसतं काका!" वामनराव गूढ गंभी[illegible]वाज्ञांत बोलूं लागले.

"म्हण[illegible] नाहीं समजलों."

" त्याचं असं आहे, आमची सौभाग्यवती दिवगत झाल्याला आज सात आठ वर्षं झालीं. परंतु देहानें जरी ती आमच्या घरांतून गेली तरी तिचा आत्मा रोज आमच्याशीं सभाषण करीत असतो. आमच्या घरांत होणाऱ्या घडामोडी तिच्याच तंत्रानं पूर्वीप्रमाणें चालत असतात बरं कोणच नि वाईट कोणच हें त्रिकालज्ञानामुळें तिला बिनचूक समजत आमचा प्रभाकर आतां बी ए. होणार फार गुणी पोरगा आहे मी काय त्याच वर्णन कराव म्हणा ! पण त्याच लग्न कराव अस माझ्या मनांत यायला लागलंय् अलीकडे. तेव्हां आमचा काल ' तिच्याशीं ' स्टोच्या सहाय्यानें वाद झाला ह्या विषयावर काय सांगू वामनराव, आपल्या कन्येला सून करून घ्यावी म्हणून हट्टच घेऊन बसली ती. मीं पुष्कळ सांगून पाहिल, पण व्यर्थ. पोराच हित कशांत आहे ते आईलाच दिसतं असं स्पष्ट बजावलन् ! आपल्या अधिकाराच्या बाहेरच्या गोष्टी आहेत ह्या. तेव्हा आपण नाहीं म्हणूं नये काकासाहेब !"

काका थक्क झाले. आपल्या मनाविरुद्ध ह्या अनत अवकाशांत आपल्या सौ ला गांठून तिच्याशीं वामनरावाच्या सौ ने सगनमत केलेलें पाहून त्याना पराकाष्ठेचें नवल वाटलें. थोडा रागही आला बिचारी लिंगदेहानें वावरत होती म्हणून बरे. नाहीं तर ह्यावेळीं तिला एखादी चापटही खावी लागली असती ! परंतु वामनरावांच्या गूढ विद्येंतील प्रावीण्याबद्दल त्यांच्या मनांत आधींच विलक्षण आदर उत्पन्न झालेला होता त्यांतून हा साक्षात्कार ! मृतात्म्यानी दोघाना व्याही होण्याची आज्ञा केलेली ! श्रद्धेनें रागावर मात केली. वामनरावांना ' नाहीं ' सांगण्याचें धाडस करवेना.

भावी जावयाला पाहाण्याच्या सबबीवर प्रभाकरला त्यानीं एकदा घरी बोलावलें. नर्मदा चकित होऊन गेली. त्याच्यावर करा करा दांत खाणारे आपले वडील त्याला पाहुणा म्हणून इतमामानें आपल्या घरीं बोलावतात हा प्रकार काय आहे हें बिचारीच्या ध्यानांत येईना. ती अक्षरशः भांबावून गेली. प्रभाकराचें आगत स्वागत करतांना तिचा जो गोंधळ उडून गेला तो पाहाण्यासारखा होता.

जेवणें झाल्यावर जेव्हां काकांनीं प्रभाकरला आपल्या खोलींत नेऊन प्लॅंचेटवर बसवलें तेव्हां सर्व उलगडा झाला. नेहमींप्रमाणें सर्व विधि यथासांग उरकल्यावर काकांनीं प्रभाकरच्या हस्तें ' तिला ' प्लॅंचेटवर बोलावून प्रश्न केला,

" हें पाहिलंस का, ह्या प्रश्नावर तुझा अखेरचा निर्णय हवाय्. नर्मदेचं लग्न कुणाशीं करावं ? "

प्रभाकरच्या हातांनीं प्लॅंचेट भराभरा फिरलें. कागदावर अक्षरें उठलीं.

बरें झालें, नर्मदेनें पटकन् समई फुंकली म्हणून. नाहीं तर कागदावरील उत्तर जर का गोपूकाकांनीं वाचलें असतें, तर प्रभाकरचीं शंभर वर्षें भरलींच असतीं. कारण उत्तर तृतीयपुरुषी लिहिण्याऐवजीं आनंदाच्या भरांत तो चटकन् 'माझ्याशीं' असें लिहून गेला होता. नमूनें तें पाहिलें आणि समई फुंकली. समई पुन्हा लावण्याची



नमूनें तें पाहिलें आणि समई फुंकली.

धांदल संपल्यावर पाहातात तों उत्तराचा कागदच सापडेना!

थोडीशी चडफड करून काकानीं पुन्हा आपल्या 'तिला' पाचारण करून तोच प्रश्न विचारला. ह्या खेपेस मात्र बिनचूक उत्तर आलें, "वामनरावाच्या प्रभाकराशीं!"






नानासाहेब पण्डित ऐवढे मोठे हपिसर पण रमाकाकूनीं 'मत्त' दिलें म्हणजे तें मोडून काढण्याची त्यांची छाती नव्हती. आज असेंच झालें नानासाहेब नको नको म्हणत असतांही रमाकाकूनीं आपलें मत्त दिलें, कीं दोन्ही जावयाना एकदम दिवाळसणाला बोलवावें, आणि शेवटीं ह्या मत्तापुढें नानासाहेबाना 'यशस्वी माघार' घ्यावी लागली !

थोरले जावई रावसाहेब भिवपूरच्या जमीनदारांचे चिरंजीव ! बी ए पर्यंत डेक्कन मध्यें शिक्षण झालेलें. जुने विचार, सनातनी वागणूक आणि व्यावहारिक भाषा त्यांची सवय जडलेली. नानासाहेबांच्या निमंत्रणाला, "अमुक गाडीनें अमक्या दिवशीं येतों." असें बाळबोध उत्तर लिहून ते मोकळे झाले. धाकटे जावई खटपटराव म्हणजे अगदीं दुसरें टोक ! बी ए. होऊन लॉच्या टर्मस् भरीत होते बुद्धि तरतरीत, उत्साह दांडगा, पण एक विचार धड नाहीं. धांदल अतिशय आणि औचित्य कशाशीं खातात हें ठाऊक नाहीं. कोठेंही बसतील, कांहीही करतील आणि तोंडाला येईल तें बोलतील ! त्यांचें उत्तर त्रोटक आणि इंग्रजींत आलें, "दिवाळी म्हणून बोलवीत असलात तर माफ करा ! भेटीसाठीं म्हणाल तर अवश्य !"

अर्थात् नानासाहेबांना पगडी फिरवावी लागली. "बरें बोवा, भेटीसाठीं म्हणतां तर भेटीसाठीं या !" म्हणून जबाब पाठविला. परंतु त्यावर उत्तर आलें नाहीं

दोघांच्याही पत्रांत बायकांबद्दल मुळींच अवाक्षर नव्हतें; त्यामुळें रमाकाकूंची कुसफूस चालू होतीच. "हे मेले पुरुष असेच. घरांत बायको आहे ह्याचीदेखील

मेल्यांना दाद नसायची. आपल्यावरूनच पाहाव मी म्हणतें!" नानासाहेबानीं तिकडे लक्ष दिलें नाहीं. मनांतून त्यांना वाटत होतें, "बरं झाल एकालाच यायला फावलं तर. दोघांची ससेमिरा नको!"

परंतु एक दिवस तार आली; "कमिंग वाइफली. खटपटराव."

ह्या तारेचा अर्थ लावण्यात दिवस गेला आणि रमाकाकूशीं खटकेही उडाले. शेवटीं नेहमींच्या रिवाजाप्रमाणें 'हाऊस ऑफ लॉर्डस्' ऊर्फ रमाकाकूनीं दिलें तें 'मत्त' खरें ठरलेंच.

धनत्रयोदशीच्या दिवशी पडितांच्या घराचा पत्ता काढीत एक गृहस्थ दादरमध्यें आला. खाद्यावर ट्रंक, खाकोटीला वळकटी आणि हातांत पाण्याचा तांब्या घेतलेल्या ह्या मुशाफराला पाहाण्यासाठीं हॉटेलांतलीं पोरें मुद्दाम बाहेर येऊन डोकावत. बिचारे नानासाहेब भल्या पहाटे स्टेशनवर जाऊन, येणाऱ्या जाणाऱ्या गाड्या तपासतां तपासतां टेकीला आले होते प्रत्येक वेळीं सारी गाडी धुडाळायची आणि रावसाहेबांचा पत्ता नाहीं असें पाहून हिरमोड व्हायचा. गाडी चुकली कीं काय, का आज येणारच नव्हते, का आपण पत्र वाचायलाच चुकलों, का आणखी कांहीं भानगड झाली, अशा अनेक शंका नानासाहेबांच्या चचल मनांत येऊन गेल्या. शेवटीं बारा वाजले तेव्हां स्वारी कटाळून घरी परतली.

इकडे वर सांगितल्याप्रमाणें गांवांत आलेले पाहुणे अचानक नानासाहेबांच्या दारात उभे राहातांच पोरांनीं घरात वर्दी नेऊन पोचवली: "ए काकू, आपल्या छबूताईचे किनई, रावसाहेब आलेत!" झालें! बातमी हां हां म्हणता पिछवाड्यांत जाऊन पोचली. राघू पाण्याची तपेली आणि मूठभर तांदूळ घेऊन धावला. तादूळ उतरल्यावर रावसाहेबानीं घरात प्रवेश केला.

"गाडीचे पैसे द्यायचे असतील ना?" काकूनीं आदबीनें प्रश्न केला.

"गाडी? छे. गाडी कशाला दहा पावलासाठी? पायींच आलों झालं."

"हमाल केला असेल मग?"

"न...नाहीं. मींच आणलं सामान. विशेष जड नव्हतं."

"इकडे भेट झाली नाहीं वाटतं?"

"म्हणजे?"

"स्टेशनावर जाऊन बसायचं झालं होतं सकाळपासून"

"कोण? नानासाहेब कीं काय? मला नाहीं बुवा दिसले स्टेशनावर."

"हुंऽऽ ! कुणीतरी भेटलं असेल तिथें नि त्याच्याशीं बोलत बसायच झालं असेल. मग गाडी आली काय नि गेली काय !"

"तरी पण मला दिसायला पाहिजे होते."

"छबीला नाहीं आणली ?" काकूनीं मुद्याची गोष्ट काढलीच.

"ती का ? तिला आणली आहे. पण माझ्या चुलत बहिणीकडे गेली आहे ती पहिल्यांदा "

"कां ?" काकूनीं चबूसारखें लांब तोंड करून विचारलें.

"शास्त्र आहे तस !"

"अग बाई !"

स्नानसंध्या आटोपून रावसाहेबांची स्वारी बाहेरच्या सज्जांत सूर्यनमस्कार घालीत असता, नानासाहेब स्टेशनावरून घरीं आले. लंगोटासारखें धोतर वर खोवून एक उघडा बोडका बजरंग सज्जांत जोर काढीत आहे हें दृश्य समोर दिसतांच नानासाहेब पहिल्यादा चपापले. परंतु जवळ गेल्यावर हा आपला ज्येष्ठ जामात आहे हें ध्यानांत येतांच त्यांनी आपलें आश्चर्य दाबून ठेवलें पण ते एकदम म्हणाले,

"आं ! हा काय घोटाळा ? रावसाहेब, आपण केव्हां आलांत ?"

"सकाळच्या गाडीनें, ठरल्याप्रमाणें."

"नि आपण काय करीत होतां स्टेशनवर ?" रमाकाकूनीं उलट तपासणी सुरू केली.

"गाड्या पाहात होतों. एकूण एक गाडी पाहिली खोटं नाहीं"

"नि मग रावसाहेबांना कसं पाहायच झाल नाहीं ?"

"वंडर आहे बुवा !" नानासाहेब गोंधळून म्हणाले, "रावसाहेब, खरंच आपण गाडीनें आलां ? कुठच्या डब्यात होतां ?"

"एका थर्ड क्लासच्या डब्यात होतों"

"हां, तरीच."

"तरीच काय ?"

"मीं सगळे सेकंड नि फर्स्ट क्लासचे डबे पाहिले. कारण थर्डमध्यें असाल ही कल्पनाच नाहीं."

"त्याचं असं झाल, की आज सेकंडला मिलिटरीची गर्दी फार होती नि थर्डमध्यें पाकं चिक्कार मोकळीं !" रावसाहेबांनीं ठेवून दिली.

"छब्या, अरे छबन ! काय म्हणतंय् तुमचं भिवपूर ? ऑलराइट !" असें

ओरडत नानासाहेब आपल्या लेकीचा समाचार घेण्याकरितां अत.पुराकडे वळले. त्याच वेळीं छबूताई एका मोलकरणीला घेऊन पुढच्या जिन्यानें वर येत होत्या म्हणून बरें झालें. नाहीं तर त्या मागून कां आल्या ह्यावर घरांत एक तासभर चर्चा झाली असती !

आतां नानासाहेबाची धांदल कांहीं विचारू नका. इकडचा लोड तिकडे ठेव, भिंतीवरच्या तसबिरी खालीं काढून रावसाहेबांना दाखव, खुर्च्यांची मांडणी फिरव, बाजाची पेटी घेऊन चार सूर काढ, असे जावयाच्या बडदास्तीखातर अनेक प्रकार त्यांनीं सुरू केले. जेवणें आटोपून रावसाहेब पानाला चुना लावताहेत तोंच दारांत "किर्रर्र किच्च्!" असा कर्कश आवाज होऊन एक मोटार उभी राहिली. मोटारींतून चोळणा नेसलेला, केस विसकटलेला, एक बोडका तरुण आणि गोल नेसून वर कोट घातलेली आणि हातात बिनमुठीची छत्री व मनीबॅग घेतलेली एक तरुणी, अशा दोन व्यक्ती उतरल्या एका लहानशा हँडबॅगशिवाय त्यांच्याजवळ आणखी काहींही सामान नव्हतें. मुलांनीं खालूनच वर्दी दिली, "काकू, अहो काकू, बेबी आली तुमची. पाहा हो, मोटारींतून बेबी आली !"

हा गलका ऐकतांच आपल्या धाकट्या जावयाचें स्वागत करण्यासाठीं नानासाहेब लगबगीनें उठतात तोंच धाडधाड जिना चढून खटपटराव घरांत आले देखील.

"राघू, अरे राघू काय ग ? हा राघू कुठे गेलाय् ? सामान आणायचं आहे खटपटरावाच." नानासाहेब राघूला हाका मारीत काकूपर्यंत गेले.

"छे छे डोंट् वरी. सामान नाहीं आमच !"

"बेडिंग् असेल ?"

"नथिंग् ! सामान घ्यायच म्हटल कीं मला प्रवास नकोसा होतो. नि डिपार्चरही जरा सडनच झाल."

"आंघोळ व्हायची असेल ना ?" काकू धाकट्या जावयाचें कौतुक करण्यास पुढें आल्या.

"अं ह ! मी महिन्यांतून फक्त एकदा आंघोळ करतों. रोज स्नान केल्यानें कातडी खराब होते असं एका डॉक्टरच म्हणण आहे. जस्ट वॉश् ॲड् ब्रश् ! कीं झाल काम"

"जेवायची तयारीच आहे." नानासाहेब म्हणाले.

"जेवण का ? जेवण नको आतां. उशीर होईल म्हणून आम्हीं येतांना मॉडर्न

रेस्टॉरंटमधून लंच घेऊनच आलों. बेबी, आय से बेबी, प्लीज् कम् हिअर माय् डार्लिंग् ! ”

त्या हाका ऐकताच बेबी पुढें येऊन म्हणाली, “ हें पाहा, असा उठल्या सुटल्या माझ्या नांवानें इथे टाहो फोडायचा नाहीं. आपल घर नाहीं हें अस ओरडायला ! हमतील इथली माणसं तुम्हाला अशा हाका मारीत सुटलात तर. ”

“ डॅम् इट् आय् डोंट् केअर ब्यागेतून सोप काढून दे नि हें काय ? हा ब्रूच असा नाहीं कांहीं खोचायचा. ”

असें म्हणून खटपटरावानीं आपल्या हातांनीं बायकोच्या छातीवरचा ब्रूच काढून आपल्याला हवा होता तसा बसवला ! बेबीनें ठराविक अभिनयानें ‘ इश्श ’ केलें. नानासाहेब त्या जोडप्याकडे डोळे विस्फारून पाहू लागले आणि रावसाहेबांनीं तर आच पसरला !

“ हें बघ राघू ”, रावसाहेबानाच उद्देशून खटपटराव सरळ म्हणाले, “ हा कोट नेऊन टाक पाहू भट्टींत ड्राय क्लीनिंगला अर्ध्या तासात परत मिळाला पाहिजे हं ! ”

रावसाहेबांनीं ओठ आवळले हा गंभीर प्रसंग कसा टाळावा ह्या विचारांत ते पडले. आपल्या थोरल्या जावयाचा हा उपमर्द काकूनीं एरव्हीं सहन केला नसता पण तो धाकट्या जावयाकडून झालेला असल्यामुळें त्यांना कांहींच बोलतां येईना. इतक्यांत ना[illegible] आठवलें, कीं आपण ह्यांची ओळख करून दिली नाहीं म्हणून असें झालें. तेव्हा ते चटकन् म्हणाले, “ बरं का खटपटराव, हे आमचे थोरले जावई—रावसाहेब देशपांडे. भिवपूरचे जमीनदार आहेत मोठे. बी ए. फर्स्ट क्लास संस्कृत स्कॉलर ( रावसाहेबांना उद्देशून — ) हे बेबीचे यजमान—आमचे धाकटे जावई खटपटराव. बी ए आहेत नि आतां लवकरच ब्यारिस्टर होणार ! ” हा परिचय झाल्याबरोबर खटपटराव जरा ओशाळले.

“ ओ ! हाउ स्टुपिड ऑफ् मी ! ”

“ त्याच काय मोठस ? ” रावसाहेब लटक्याच सौजन्यानें म्हणाले

“ मी बॅरिस्टर नाहीं, बरं का ! ”

“ आतां नसले तरी लवकरच होणार. ” नानासाहेबांनीं समर्थन केलें.

“ सध्या मोटर डायव्हर आहें मी ! ” खटपटरावांनीं आपल्या सासऱ्यांनीं श्वशुरांच्या पायाखालीं केळ्याच्या साली फेकण्यास सुरुवात केली ! “ फुटकी वहाण, तुटकी वहाण, जावई लहान, नसावा बा ! ” ह्या लोकापवादाची नानासाहेबांना,

आठवण व्हायला लागली. त्यांनीं पुन्हा सावरण्याचा प्रयत्न केला.

" आमचे खटपटराव किनई फार कोटीबाज नि मॉडेस्ट बोवा कारखाना आहे घरीं मोटरीचा आणि म्हणे मोटर डायव्हर. "

" नॉन्सेन्स ! " खटपटरावानीं पुन्हा एक साल फेकली

" कारखाना कुठचा आलाय्? एकदा नापास झालों. तात्या म्हणाले, बेटा खटपट, तू कुचकामाचा आहेस तुला 'दमडी' मिळवता येणार नाहीं. लगेच मी दमडी मिळवून दाखवण्यासाठीं सरळ रावबहादुर भोपळ्याकडे शोफरची नोकरी धरली अजून तिथेंच आहे इट्स् ए प्लेझर् रावसाहेब. तुम्हीं एकदा ट्राय करून पाहा "

बिचारे नानासाहेब या केळ्यांच्या सालींवरून आपला तोल कसा सावरणार? त्यांनी मुकाट्यानें राघूला हाक मारली आणि खटपटरावाचा कोट ड्राय क्लीनिंगला पोचवला. खटपटराव आपल्या नट्टापट्टयाच्या उद्योगाला लागले. जावयाच्या बरोबर सामान नाहीं असें पाहून रमाकाकूनीं ठेवणींतली दोन धोतरें काढून बेबीजवळ दिली. बेबी म्हणाली, "आई, ह्यांना धोतर नेसायची सवय नाहीं पायजमे असले तर काढ बाई " तेव्हा पायजम्याकरतां शोधाशोध सुरू झाली. मागें केव्हा तरी नानासाहेबांच्या आजारीपणात शिवलेले दोन पायजमे रमाकाकूंनीं मोठ्या खटपटीनें शोधून काढले ! बेबीच्या तऱ्हेवाईक वागणुकीबद्दल त्यांच्या तोंडाचा पट्टा मात्र जो चालू झाला तो तासभर कायम होता.

टॉयलेट केल्यावर खटपटराव बाहेर आले तेव्हां एका दुबोटी लंगोटीशिवाय त्यांच्या आंगावर काहींही नव्हते रमाकाकू घाबरून आंत पळाल्या. त्याचप्रमाणें छबूताई आपल्या खोलींत ज्या दार लावून दडून बसल्या, त्या बेबीनें कितीही हाका मारल्या तरी बाहेरच येईनात शेवटी बेबीनें दाराशीं तोंड लावून हळूच म्हटलें,

" अग छबे, दार उघड. ह्यांना जानव हवय् एक "

" म्हणजे? जानव काय झाल त्यांच ?"

" कुणाला ठाऊक? घरीं कधीं जेवायला उघड्यानें बसत नाहींत. तेव्हां बरेच दिवसांत जानव आहे कीं नाहीं तें पाहाण्याची वेळच आली नाहीं."

"अगो बाई!" असे उद्गार काढून छबीनें एक जानवें ट्रंकेंतून काढून दिलें. धाकटे जावई लंगोटी नेसून गच्चीवर "सूर्यस्नाना" करतां जाऊन पडले, ते चांगले तासभरानें खालीं आले. आल्याबरोबर त्यांनीं पायघोळणा पेहरला, बेबीला हाक मारली

आणि नवराबायको आपल्या खोलींत गुडुप झालीं! रावसाहेब बिचारे सज्जांत एकटेच 'नेपोलियनची कारकीर्द' वाचीत ताटकळत होते तिकडे नानासाहेब रमाकाकूजवळ जावयांच्या : . . : तऱ्हेतऱ्हेचे कार्यक्रम मांडीत होते काकू प्रत्येक ठरावावर आपले काहीना कांहीं मत देत होत्याच, आणि नापास झालेले ठराव बिनतक्रार परत घेण्याचा नानासाहेबांचा क्रम चालू होता

संध्याकाळीं पांच वाजता बेबीला घेऊन खटपटराव जे मुंबईत भटकायला म्हणून बाहेर पडले ते रात्रीं दहा वाजतां परत आले जेवण्याचा फार्स सकाळप्रमाणेंच हॉटेलांत उरकलेला होता त्यामुळे घरीं येताच फोनो लावण्याची त्याना लहर लागली. थोरले जावई एव्हाना स्वस्थ झोपीं गेले होते. त्यांच्या नादी न लागता खटपटरावानी नवीनच आणलेली 'रबा' डान्सची प्लेट लावली आणि स्वारी ग्यालरींत गाण्याच्या तालावर नाच करू लागली

बाहेर एकाएकी धडपड कसली झाली ते पाहाण्यासाठीं उष्टीं खरकटी करणाऱ्या गोदूताई हातांत तसाच शेणगोळा घेऊन दारातून पाहू लागल्या जावयाचा तो धिंगाणा पाहून त्या घाबऱ्या घाबऱ्या खाली गेल्या आणि रमाकाकूना सांगू लागल्या,

"अग बाई, काकू, खटपटराव पाहिलत का कस करताहेत?"

"कसं म्हणजे काय करताहेत?"

"साऱ्या ग्यालरीभर नाचताहेत आणि तोंडाने गाताहेत काय, चुटक्या काय [illegible] ! बाई, मला तर हसूच यायला लागल ते चाळे पाहून."

"अग बाई, खरंच का? बबे, ए बबे!"

पत्रलेखनात गर्क झालेल्या बेबीताई आईसाहेबांच्या हाकेनें एकदम दचकून भानावर आल्या आणि म्हणाल्या, "हें ग काय आई? केवढ्यादा दचकलें ना मी?"

"खटपटरावाच हे नेहमी असच का चालत बबे?"

"हं ऽ ऽ!" बेबीनें नुसताच एक लाब निश्वास टाकला.

"मला कळवलं नाहीस तें कधीं? इकडून चार शब्द सागण तरी झालं असत."

"कशाला तें?"

"अग कशाला काय म्हणतेस? एकदा पिण्याची संवय लागली कीं मोडण कठीण असतं बबे!"

"इश्श! भलतंच काय बोलतेस आई? पीत बीत नाहींत हो ते. इग्रजी नाचगाणं त्यांना आवडत इतकच."

मायलेकींचें एवढें होत आहे तोंच माडीवरून खडाजंगी भांडणाचा आवाज ऐकूं आला. वर जाऊन पाहातात तों दोघे जावई तेरी मेरीवर आलेले! फोनोचा कर्णा तोंडांत धरून फों फों असा आवाज काढीत खटपटराव रावसाहेबांच्या समोर नाचत आहेत, आणि गुढग्याएवढा पंचा नेसलेले रावसाहेब फोनोच्या प्लेटचे तुकडे करून दाही दिशांना भिरकावीत आहेत, असा देखावा मायलेकींना दिसला! खटपटरावांचें मानगूट पकडण्यासाठी रावसाहेब उड्या मारीत असता त्याची शेंडी हवेंत एखाद्या आंब्याच्या डहाळीसारखी लटलट उडत होती.

"आता आवाज बंद करता की नाही?" ते गरजले.

"आवाज नाही. म्यूझिक् आहे! फोंम् फो ऽ ऽ!" खटपटरावांनीं उत्तर दिलें.

"जळो तुमचं म्यूझिक्! भलत्या वेळी बोंबाबोंब चालवली आहे घरात. लोकांना झोपा नाहीत, नि म्हणे म्यूझिक्!"

"अरे, अरे, खटपटराव हें काय? फार थट्टेखोर बुवा तुम्हीं!" ग्यालरींतली दंगल ऐकून धावत आलेले नानासाहेब झगडा थांबवण्यासाठीं म्हणाले. त्यांच्या आंगांत एक ओव्हरकोट आणि हातात सोटा होता!

"थट्टा नाही नानासाहेब. हा तुमचा जावई, माणूस आहे कीं सैतान आहे? ह्याला काहीं मॅनर्स आहेत की नाही? भलत्या वेळीं धिंगाणा घालून लोकांच्या झोप मोडायच्या म्हणजे काय?" रावसाहेब सतापून म्हणाले.

"नि ह्या खेडवळ म्हसोबाला कुठून हुडकून काढलात आपली मुलगी द्यायला कोण जाणे! फाइन आर्ट कशाशी खातात ते माहीत नाहीं गद्धयाला!" खटपटरावानी फोनोच्या कर्ण्याचा लाउडस्पीकरसारखा उपयोग करून उलट आहेर केला!

हो हो करून दोघा जावयांना शांत करण्यांत नानासाहेबांचा अर्धा जीव आटला. ती गडबड शांत झाल्यानंतर ते आपल्या खोलींत निजायला गेले परंतु त्या प्रसंगावरून आतां दिवाळीचे चार दिवस कितपत गुण्यागोविंदानें [illegible]
त्यांना झोपेशिवाय तळम[illegible]
[illegible]

उलट मुलाच्याबरोबर ते फटाके लावीत बसले ते किती वेळ उठेचनात ! शेवटीं नानासाहेब राघूला लटकेंच दरडावून म्हणाले, “ राघ्या, आंघोळी झाल्या ना सगळ्यांच्या ? मग आतां कशाला बबात लाकड कोंबतो आहेस ? ” तेव्हां राघूही जरा मोठ्यानेंच म्हणाला,

“ धाकले जावई न्हाय्राचेत न्हव का ? ”

स्नाने उरकल्यावर कोणाला काय आवडते ह्यावर चर्चा सुरू झाली होती.. रावसाहेब म्हणाले,

“ आपल्याला श्रीखंड मनापासून आवडत बुवा ”

“ आय हेट इट् ! ” खटपटरावानीं आपला अभिप्राय देऊन टाकला.

“ मला देखील श्रीखड इतकस आवडत नाही. ते आगावर येत. त्यापेक्षां सुधारस बरा. ” खटपटरावाना चुचकारण्याच्या इराद्याने नानासाहेब म्हणाले

“ आज आमच्याकरता काहीं करायचच असल तर मटनचॉप्स करा सुदरपैकी ! ” खटपटरावांनी धाडकन् बॉब टाकून दिला

“ ओअॅक ! ” रावसाहेबानी ओकारी दिली.

नानासाहेबाचा चेहेरा फोटो काढण्यासारखा झाला.

“ आमच्याकडे जमणार नाहींत कोणाला. ” त्यांनीं अडचण काढली.

“ कां ? बेबी, आय से, डियरी ! कम हियर बेबी वुईल्ल डू इट् नाइसली ! ”

“ वाहवा ! बेबी शिकली का हें करायला ? बबे, ए बबब्या... ” आपल्या लाडक्या कन्येचें कौतुक करण्याकरतां नानासाहेब हाका मारू लागले.

“ काहीं नकोय् कौतुक करायला लेकीच आपल्याला आपल सगळ्याचच कौतुक ! ” दाराआडून गोळीबार झाला, “ नसते ढग करायला शिकलीय् ती ”

नानासाहेबांनीं सभाषणाला फाटा देण्याकरतां एलिफटा केव्हजूच्या गोष्टी काढल्या. परंतु त्यांतही प्रकरण लवकरच हातघाईवर येण्याचा रंग दिसू लागला.

...पल्याला आवडत नाहीत. त्यापेक्षा सरळ मुबईतला

... एक बार उडविला.

गावांतलं पारणेश्वराचं मंदीरच घ्याना. काळ्या फत्तरांत बांधलय्. पण नक्षीकाम काय! अहाहा! अप्रतिम! चिऱ्याला चिरा असा जोडलाय कीं जणू तें देऊळ खडकांतून एकसंध फोडून काढलय्!" रावसाहेब प्राचीन शिल्पकारांची कड घेऊ लागले.

"उलट मी म्हणतो त्याचा किती वेळ फुकट जात होता हें दाखवणारीं तीं चिन्हं आहेत" खटपटराव बेधडक म्हणाले, "असल्या निरुपयोगी कामात काहीं जीव आहे का? उगीच वेस्ट ऑफ लेबर् अँड टाइम् आपल्याला तर त्यांत काहीं ब्यूटी दिसत नाहीं बुवा त्यापेक्षा कावळ्याच्या छत्र्यादेखील जास्त शोभिवत दिसतात"

"काही तरी बोलता झाल!" रावसाहेब चिडून म्हणाले. हाही विषय रंगत नाहीं असें पाहून नानासाहेब जरा विचारात पडले. इतक्यात काकू सागत आल्या, "ऐकल का? जोश्याची कुसुम म्हणे त्या बरजोरबरोबर काल पळून गेली. ऐकावं तें नवलच एकेक!"

"ऐका!" नानासाहेब आश्चर्यानें डोळे विस्फारून म्हणाले, "काय म्हणावं ह्या कार्ट्यांना? नि आईबापानीं तरी असल्या पोरापुढें काय रडाव?"

"कोण होता बरजोर?" रावसाहेबानीं पृच्छा केली.

"विड्या वळीत असे मेला बहादुरजीच्या दुकानात. आपली तरणी ताठी शिकलेली पोर पाहिली नि लावलीन् मेल्यानें फूस नि ती कार्टी तरी पाहा. लहान का आहे? कॉलेजच्या पहिल्या वर्षापर्यंत शिकलेली! खुशाल नादीं लागली त्या मेल्याच्या! आपल वाटोळ करून घेतलन् ते घेतलन् नि बिचाऱ्या आईबापाच्या तोंडाला काळोखी आणलीन्!" काकूनीं 'सडेतोड' म्हणतात ती टीका केली!

"हरे राम. कहर आहे बुवा!" रावसाहेबानीं खेद व्यक्त केला

"काय आहे कहर त्यात?" खटपटरावांनीं उलट पक्ष घेतला. "मी म्हणेन त्या पोरीच्या धैर्याची शाबास आहे"

"धैर्य कसचं डोचक्याचं?" रावसाहेबांनीं आखाड्यांत प्रवेश केलाच.

"तिच्या मनाच. आपल मन ज्या तरुणावर असेल तो कोणीही असला तरी त्याच्याकरता आपल्या घरादाराचा त्याग करून चालत होणं हें सोप काम नाहीं महाराज! बाकीच्या शेकडों मुली अशा वेळीं आपल्या मनाची खरी प्रेरणा दडपून ठेवतात नि आईबापांना आपल हृद्गत सागत नाहींत. प्रेमापुढं जातगोत, गरीबश्रीमंत हा कांहीं भेद नाहीं मिस्टर!"

---

[illegible]

"अहो पण दिवसेदिवस या कुलीन गरत्या पोरीचीं मन चांगल्या तरुणांवर बसायचीं राहून इतक्या हलक्या दर्जाच्या माणसावर का बसू लागलीं ? तिला काय दुसरे चांगले प्रियकर मिळाले नसते का ? " काकूनीं पॉइट काढला

"त्यातच तर प्रेमाची मजा आहे प्रेमाला दर्जा कुलीनपणा वगैरे ठाऊक नसतो आणि हल्लीं जात गोत आणि दर्जा याचा भेदाभेद मानायचा नाहीं असच सर्वांच मत आहे ! या तुमच्या कुसुमनें बाकीच्या तरुणींना आपल्या धाडसी कृत्यानें धडाच घालून दिला अस मी म्हणतों. यातच खर शौर्य आहे "

" छान ! उद्या कमरेच सोडून डोक्याला गुडाळून कोणी भर रस्त्यात नाचूं लागला कीं तारीफ कराल तुम्ही त्याच्या शौर्याची " रावसाहेबानीं पवित्रा घेतला.

"हो हो, अवश्य करीन " खटपटरावानीं दड ठोकले.

"काय बबे ? हे काय म्हणतात ऐकलस का ? " नानासाहेबानीं याही विषयाला बगल देण्याचे हेतूने फालतू माणसाना उगीचच हाका मारण्यास सुरवात केली "आमचे धाकटे जावई म्हणजे काय रावसाहेब, नुसती विजेची स्पार्क आहे स्पार्क."

"स्पार्क हवीच नाही तरी माणसात!" हाकेला धावून आलेल्या बेबीनें आपलें जजमेंट देऊन टाकलें

दुसऱ्या दिवशीं संध्याकाळी सिनेमाला जायच्या गोष्टी निघाल्या.

"आपल्याला विलायती चित्रपट आवडत नाहीत. " रावसाहेब म्हणाले.

"त्यांतल काहीं समजत असेल तर ना !" खटपटरावानी टोमणा दिला

"तुम्ही म्हणा तसं पाहिजे तर पण आपण आपला देशी चित्रपट पहायला जाऊ चागल्यापैकीं "

"ओअॅक !' खटपटरावांनी ओकारी दिली.

"नव्या थिएटरांत सावकारी पाश म्हणून चित्रपट लागलाय्. तो फार चांगला आहे असं सांगत होत्या सोहन्याच्या द्वारकाताई ! " काकूनीं बातमी दिली

"आय हेट दीज इडियन् पिक्चर्स ! तो पहाण्यापेक्षां मजनमजुरीची शिक्षा पुरवली ! "- खटपटरावानीं आपलें म्हणणें पुढें माडले. प्रकरण पुन्हा तेरीमेरीवर येणार असा रंग दिसतांच बिचारे नानासाहेब कावरेबावरे झाले.

"छबे, तुझ काय मत आहे ? त्यानीं आपली व्होट घ्यायला सुरवात केली "

"सावकारी पाश. " छबीनें मत दिलें.

"आपल्या आईची अगदीं कार्बन कॉपीच आहे." बेबीनें छबीच्या निकालावर

शेरा मारला.

"बरं असू दे! तुला नाहीं कुणीं विचारलं. लुब्री कुठची!" छबी उसळली. आतां या दोघीची झिंज्या ओढ जुपते कीं काय अशी काकूना भीति पडली!

"आपण जुहूला जाऊ या गडे बिमानात बसायला" बेबीनें टूम काढली.

"दॅट्स ॲन् आयडिया!" खटपटरावानी हात वर केला आणि सरळ बेबीच्या हातावर टाळी दिली!

"मग काय रावसाहेब, येतां का जुहूला?" नानासाहेबानी पुन्हा व्होटिंग सुरू केले.

"विमानात बसलां नव्हता ना तुम्ही पूर्वी कधी?"

"न. नाही पण मला सोसणार नाही ते"

"कां?"

"अहो नाना," छबी म्हणाली "झोपाळ्यावर देखील याना भोवळ येते! परवा जत्रेत बसले रहाटपाळण्यांत नि ओकले की पहिल्या गिरकीलाच!"

"मग?" नानासाहेब पुन्हा पचायतीत पडले

"आम्ही जातों जुहूला तुम्हीं या पाहून ती यमपुरी!" बेबीनें तोड काढली.

"यमपुरी?" रावसाहेबानी आश्चर्याने विचारलें

"यमपुरी तरी बरी या देशी चित्रपटापेक्षा!" खटपटरावानी सरळ ठोकून दिलें.

"आपण तर जाणार बोवा, सावकारी पाश पहायला." रावसाहेबांनीं आग्रहच धरला

"मी येणार" छबी म्हणाली

"मला सुद्धा तेच बर वाटत." रमाकाकूनी दुजोरा दिला.

"मग आता अस करू," नानासाहेबानी सुवर्णमध्य काढला, "मी जातों खटपटरावाबरोबर तुम्ही जा रावसाहेबाना घेऊन सिनेमा पहायला"

शेवटीं हीच तडजोड अमलात आणावी लागली काकू, छबी आणि रावसाहेब हें त्रिकूट मुबईस सिनेमा पहायला आणि बाकीचा त्रिफळा जुहूच्या एरोड्रोमवर, अशी विभागणी झाली. जुहूला गेल्यावर पधरा मिनिटे उडण्याचे एक तिकीट काढून त्यावर तिघांनी आळीपाळीनें पांच पाच मिनिटे उडावे असा खटपटरावांचा बूट निघाला. परंतु दर पांच मिनिटांनी विमान खालीं आणण्याचें पायलटनें नाकारलें. त्यावर कायदा, सवलत, [illegible] राइट्स्, लिमिटेशन ॲक्ट, पीनल कोड वगैरे अनेक भानगडी उपस्थित करून खटपटरावानीं पायलटशीं तब्बल एक तासभर हुज्जत

घातली! तोंवर नानासाहेब आणि बेबीताई समुद्रस्नान आटपून कपडे वाळवून परत आलीं. शेवटीं खटपटरावांनीं पायलटचें म्हणणें, "अंडर प्रॉटेस्ट" कबूल केलें आणि एक मोठेसें विमान पाहून तिघेंही आंत बसलीं 'बारा वर्षांखालील' या सदरांत बेबीचाही विमानांत समावेश होऊ शकला पायलटनें विमान वर नेतांच खटपटराव ओरडून म्हणाले,

"आम्हांला प्याराशूटनें उडी मारायची आहे."

"भलतंच साहस नको ह खटपटराव" नानासाहेब घाबरून म्हणाले

"साहस कसल? बेबीला घेऊन मारतों उडी!"

"प... प... पण खटपटराव." नानासाहेबाची बोबडीच वळली!

"नॉट अलाउड!" पायलटनें प्रश्न निकालात काढला

"कोणत्या कायद्याखालीं?" खटपटरावाच्या डोक्यात अजून नागरिकत्वाचे हक्क आणि कायद्याचीं कलमें थैमान घालीत होतींच!

"माझा हुकूम."

"कचऱ्याच्या पेटींत टाका आपला हुकूम"

"थोबाडींत खाल आतां गडबड केलीत तर!" प्रकरण थोडक्यावर मिटत नाहीं असें पाहून पायलटनें खडकावलें प्रकरण हातघाईवर येऊ नये म्हणून नानासाहेबांना पुन्हा मध्यस्थी [illegible] परंतु खटपटरावाची टुरटुर सुरू झाली,

"होपलेस्! मजा गेली सगळी उडण्यातली"

दुसऱ्या क्षणींच त्याच्या मनात काय आलें कोणास ठाऊक एक सुताची सुरळी करून त्यांनीं तीं पायलटच्या कानात गुर्रकन् फिरवली! पायलट एकदम दचकला आणि त्यासरसा त्याच्या हातांतल्या जॉयस्टिकला एक हिसका मिळाला. ताबडतोब विमानाचें नाक खालीं होऊन तें पतंगासारखे गरगर गोते खाऊ लागलें. परंतु पायलट हुशार असल्यामुळें प्रसंगावधान राखून त्यानें योग्य त्या दिशेनें सुकाणूं फिरवलें आणि विमान सुरक्षितपणें जमिनीवर आणलें. खटपटरावांच्या प्रतापामुळें विमानाला जी गिरकी मिळाली त्यामुळें बेबी मात्र भडाभडा ओकली आणि नानासाहेबांच्या पोटांत कसेसेंच होऊ लागलें!

खालीं उतरतांच त्या भल्या भक्कम पायलटानें खटपटरावाचें बकोट पकडलें. "थांबा मिस्टर. आपल्याला थोडा पायलट लेसन द्यायचा आहे" असें [illegible] नें बोलून त्यानें एक सणसणीत चपराक खटपटरावाच्या कानशिलांत ठेवून दिली! खटपटरावांच्या

डोळ्यांपुढें अस्मानच्या पऱ्या दिसू लागल्या "पोलीस पोलीस!" अशा आरोळ्या ते मारू लागले. पण त्याचा कांहीं उपयोग न होता पायलटनें पुन्हा हाताला थुंकी



त्यानें एक सणसणीत चपराक खटपटरावांच्या कानशिलांत ठेवून दिली !

लावून दुसरी चपराक देण्याची तयारी केली तेव्हा आता चिन्ह ठीक दिसत नाहीं असें पाहून नानासाहेबांनीं पोटांत कसेसेच होत असतांही आपली सारी इभ्रत इरेला घातली आणि खटपटरावांना त्या कचाट्यांतून सोडवलें बेबीला चार जिनतानच्या गोळ्या घेऊन दिल्या तेव्हां ती सावध झाली. नाहींतर तिच्यानें एक पाऊल उचलवत नव्हतें!

वाटेंत खटपटरावांची फटाक्यांगतीं हुट्ट चालू झाली. नानासाहेबांना अनेक दुकानें हिंडवू नगृहस्थानें पांच सात रुपयांची दारू खरेदी केली. आतां मुंबईत जास्त फिरण्यांत हंशील नाहीं हें ओळखून नानासाहेबांनीं सरळ स्टेशनचा रस्ता धरला आणि जी सांपडली ती लोकल गाठली. ट्रेनमध्यें बसल्यावर खटपटरावांची चळवळ सुरू झाली नानासाहेब आपले एका बाकावर डोळे मिटून स्वस्थ पडून

राहिले बेबीही मलूलच होती खटपटरावांनी पहिल्यानें डब्यांतील सगळ्या पाट्या वाचून काढल्या नतर त्याची नजर दुधाच्या कावडी, चरव्या, हब्या वगैरे वाटेत ठेवून बाकावर पसरलेल्या गोपाळ भय्याजींकडे गेली. त्याबरोबर या अडाणी भय्याला नागरिक स्वातंत्र्याची जाणीव करून द्यावी असे त्याच्या मनांत येऊन ते म्हणाले, "क्यों, भय्याजी? रस्ते में कैसे रख्खा अपना बारदान?"

"हमेश वहीं रखते है!"

"ये ठीक नहीं"

"नहीं तो क्या अपने सिरपर रखनेका?" भय्याजींनीं सरळ सवाल केला. भय्याजी उघडे बंब असून त्यांनीं टीचभर धोतराचा बोळा हातरुमालासारखा कमरेशीं गोळा करून खोचला होता तुळतुळीत मोठ्या डोक्यावर शेंडीचे चार केस चिकटून बसले होते घामाने निथळणारें त्याचें बहुतेक आंग नवीनच भादरलेल्या म्हशीप्रमाणें तुळतुळीत दिसत होतें. काखेंतल्या गोचिड्या काढण्याचा त्यांचा उद्योग सतत चालू असून तोंडानें 'सबसे राम भजन करलेना' च्या लकेऱ्या बाहेर पडत होत्या. शेजाऱ्याने दिलेल्या चिलमीचा ते मधून मधूनच एकादा जोरकस झुरका मारीत आणि मिशा फेंदारून आपला दोहा दुप्पट खड्या सुरानें ऐकवीत. खटपटरावासारख्या अनेक 'चिलट-मच्छर' प्यासिंजराच्या बडबडीला ते आजवर पुरून उरले होते

"सिरपर कायकू? उपर रॅक तो है ना? बहूत जगा है उधर लेकीन आपको समज नहीं प्यासिंजरकु कितना तकलीफ पडता है यहा रखनेसे?"

"वाहवा, वाहवा," भय्याजींनीं मान डोलवली 'प्यासिंजरका इतमाम करनेवाले? अक्कल तो देखो इनकी? क्या सूरत? क्या होशियारी? वहावा! वहावा!"

"अब्बी हम खबर देंगे गार्डकू." खटपटरावांनीं दम भरला

"आपकी मर्जी." असें म्हणून भय्याजींनीं चिलमीचा दम भरला

"आप दूध बेचते बंबईमें?"

"हॉ आपकू कोई तोशीस?"

"मेरेकू नहीं. लेकीन अपना गिऱ्हाईक लोगोकू. देखो, अपनी रहानी और पेहरनी, कितनी खराब! ये पोर्टर लोक अपने से अच्छे तऱ्हेसे पेहराव—"

"खामोश! क्या लगाया ये बकबक ससूर? तुम क्या दूध लेते हमारेसे? अभी बात बंद कर नहीं तो फेंक दुगा बहार!" भय्याजींनीं एक गोचीड उपटून काढून

सळर बाहेर भिरकावली. आपलें सामाजिक कार्य करावयास हें स्थळ योग्य नव्हे असें पाहून खटपटरावांनीं तो नाद सोडून दिला

परंतु त्याचा परिणाम असा झाला कीं त्यांना दुसरीच एक हुक्की आली. आपल्याजवळच्या फटाक्यांतून स्वारीनें एक लांबलचक चिचुदरी काढून पेटवली आणि ती हातात धरून ते गरगरा फिरवू लागले! परतु चिचुदरी ही फुलबाजीसारखी निरुपद्रवी चीज नव्हे हे त्याच्या ताबडतोब लक्षात आलें. तिचा जाळ फर्रकन् हातावर आला आणि त्यानीं ती पटकन् खाली टाकून दिली आणि मग मात्र डब्यांत हाहाःकार उडाला ती चिचुदरी सुर्रदिशीं इकडून तिकडे झपाट्यानें फिरू लागली तिच्या जाळापासून बचाव होण्याकरता लोक धोतरें सावरून बाकावर नाचू लागले. हातून सुटलेल्या झुरळाला धरायला जावे त्याप्रमाणे खटपटराव त्या चिचुदरीच्या मागोमाग धावू लागले होता होता चिचुदरीचा वेग वाढला आणि हा हां म्हणतां ती एका शेटाणीच्या लुगड्याच्या पसाऱ्यांत घुसली!

"अरारारा! मर गई. अम्मा मर गई. काकाजी, मर गई!" असें ओरडत ती गुजराथी बाई आपला लहगा झटकीत धावू लागली. त्या लहग्यात चिचुदरीला पुरेशी हवा न मिळाल्यामुळे ती लवकरच विझली खरी. पण लहगा पेटला! खटपटरावानी चपळाई करून आग विझवण्यासाठीं हाताशीं सापडला तो भय्याजींचा हडा उचलला आणि त्या शेटाणीला दुधाचे सचैल स्नान घातलें! यामुळें आग विझली पण भय्याजी दड ठोकून उभे राहिले आणि खटपटरावाची नि त्यांची डब्यात शिवाशिवी सुरु झाली!

गाडी उभी राहाताच रेल्वे अधिकारी तपास करण्यासाठीं डब्यांत शिरले. नानासाहेबही खडबडून जागे झाले चौकशी करता खटपटरावाच्या चिचुदरीनें हा गोंधळ केला हें बाहेर आले भय्याजीच्या दुधाचे आठ रुपये जागच्या जागीं नानासाहेबाना चुकते करावे लागले पुढच्या स्टेशनावर अधिकाऱ्यानीं खटपटरावांना अटक केलीच तिघानाही तेथेच उतरावें लागलें. बेबीच्या तोंडचे आतां मात्र पाणी पळालें. नानासाहेबानाही काय करावे हे सुचेना. इतक्यांत एका ममताळू शेटजीनें जातां जातां स्टेशनमास्तराला सूचना केली, "अरे मास्तरसाहेब, कसाला नादीं लागते तेच्या? ए देशावरले लोक. एनला बबईची गरमाई सहन न होते. मगजला उन्हाचा च्यटका लागून गेला हाय बिचाऱ्याच्या."

त्याच्या या उद्गारांतून नानासाहेबांना एक कल्पना सुचली स्टेशनमास्तरला



एकीकडे घेऊन ते म्हणाले, "हें पहा मास्तरसाहेब, मेंटल ट्रबल आहे थोडा यांना आणि त्यांतून सनस्ट्रोक! मुद्दाम दांडगाई करण्याचा हेतु नव्हता त्यांचा!" स्टेशन मास्तराची समजूत पटली पण रेल्वे डॉक्टराकडून तपासणी होईपर्यंत खटपटरावांना ठाण्याला पाठवण्याचा त्यानें हट्ट धरला तेव्हां दोन दिवस त्यांना ठाण्याच्या इस्पितळांत ठेवण्यास नानासाहेब तयार झाले. लगेच मास्तरानी अॅम्ब्युलन्स मागवून खटपटरावांची तिकडे रवानगी केली.

'प्राणावर बेतले होतें पण बोटावर निभावलें हें समाधान मानून घे' अशी बेबीची समजूत करीत नानासाहेब कसेबसे घरी परत येतात तों घरात रडारड चाललेली! हा काय प्रकार म्हणून चौकशी करता रमाकाकूंनीं हुदके देत सांगितलें,

"रावसाहेबांना शिपायांनीं धरून नेल "

"का धरून नेल?"

"एका पारशाशीं मारामारी केली त्यांनीं "

"शाबास. आणि ती कुठे?" नानासाहेब मटकन् खालीं बसले

"थेटरात "

"का?"

"तो मेला माझ्याजवळ बसून एकसारखा सिगारेट फुकीत होता. म्हणून मी त्याला म्हटलं कीं धूर माझ्या तोंडावर येतो आहे. लांब बस. तो कांहीं केल्या ऐकेना तेव्हां रावसाहेब चिडले आणि त्याला उठवूं लागले त्यांची बाचाबाची झाली सुरू रावसाहेब त्यांना म्हणतात, 'काकडीखाऊ, भेंडीखाऊ, असे तुम्हीं लोक ' तो उलट म्हणतो, 'तुम्ही टाव्यालोक इडियट. आलूची भाजी खा जा!' ते काहीं यांना सहन झाल नाहीं. यानीं दिली त्याच्या मुसकाडींत. तो लागला पोलीस पोलीस करून ओरडायला. म्यानेजर आला पोलीस घेऊन. त्यानीं पारशाचे दांत पडलेले पाहिले तेव्हां रावसाहेबांना गिरफ्दार करून नेल. आमच काहीं ऐकल नाहीं! मग कसचा सिनेमा नि कसच काय?"

"हरे राम! कुठनं मला अवदसा आठवली आणि ही जावयांची जोडगोळी एकदम घरांत आणली कोणास ठाऊक?" नानासाहेब त्रासून म्हणाले, "रत्नं आहेत रत्न! एक पौर्णिमेला जन्मलाय् तर दुसरा अवसेला! एक कुचल्याच बी तर दुसरं! धोतऱ्याचं बोंड! छे छे तुझा हट्ट बरं हा! घे आतां बक्षिस आपल्या मत्ताचं चांगली दिवाळी केली हरामखोरांनीं! एक पडलाय् ठाण्याच्या इस्पितळांत अन्

दुसरा पोलीस कोठडींत. ”

“पण नाना, आतां सोडवून नको का आणायला त्यांना?” दोघी लेकी काकुळतीने विचारू लागल्या. त्यांच्या पाठीवरून हात फिरवीत नानासाहेब उठले आणि म्हणाले, ‘अग रडता काय अशा पोरीनो? मी असल्यावर काय काळजी आहे? थाबा! आतां घेऊन येतों परत दोघाना. ऐकलस का ग? पान वाढ लवकर. छबे, विडा कर पाहू माझ्याकरता एक छानसा! तोंवर मी पाटणकराना फोन करून येतों चटकन् ”

असें सागून स्वारी बाहेर पडली दोन्ही जावयाना मुबईचा थोडा फार प्रसाद मिळाला हें एकपरीनें ठीक झालें असें त्याना वाटत असावे कारण स्वारी बाहेर जी पडली ती आपलें आवडतें पद गुणगुणतच!




“काय ग,” मी सिंधूला विचा[illegible] छगन राहाणार आहे तरी किती दिवस इथे ?”

“मीही तेच म्हणणार होते अ[illegible]ला वाटत आपण त्याच्याजवळ एखादा हळूच गोष्ट काढावी......”

* * *

किती भोळी आमची सिंधू ! तिला वाटत होतें अशा हळूच काढलेल्या गोष्टीचा छगनवर परिणाम होईल आणि लगेच तो दुसरीकडे जागा पाहायला लागेल

तिच्या माहेरच्या माणसाचा पसाराच एवढा अजस्र होता, कीं दर आठवड्याला कोणी ना कोणी तरी पाहुणा तिच्या माहेरची ओळख सांगून आमच्या घरात मुक्काम ठोकायचा आणि मग दुसरा पाहुणा येईपर्यंत हालायचा नाहीं. बरें, ह्या सर्वांची सिधूला ओळख पटे असें मुळींच नाहीं कारण ती म्हणे, ‘माणस इतकीं असल्यावर नातीं ध्यानात ठेवावीं तरी कुठवर ?’ आणि खरेंच होते तें आम्ही तितके सोवळे असतों तर रोज आमच्यावर सोयर किंवा सुतक पाळण्याची वेळ येती !

आज काय मामेभाऊ, उद्या आतेभाऊ, परवां मावशीची पुतणी, तेरवा मामाचे काका अथवा काकाचे मामा असा पाहुण्याचा धडाका चालू असे. पाहुणा आला कीं त्यानें उगीचच ‘सिंधे, सिंध्या, शिंधू, चिंध्या,’

अशा लाडिक हाका मारीत स्वयपाकघरापर्यंत मजल मारावी आणि सिंधूनें 'कोण हा बाई' असा प्रश्नांकित चेहेरा करून त्याच्यापासून लाब लांब पळावें. मग त्यानें हसत हसत म्हणावें, 'पाहा काय लबाड आहे ती! माहेरीं आमच्याशीं घोडा घोडा खेळायची, नि इथे किती लाजते आहे!' हा नेहमींचाच अनुभव. पाहुण्यानें घसट दाखवावी, लगट करावी, आणि आम्हांला ती नकोशी वाटावी. मी म्हणे, काय ग सिंधू, तुमच्या माहेरी कधीं प्लेग, कॉलरा किंवा देवीची सांथ आलीच नाही का? आली असती तर हीं एवढी माणस जिवत राहिलीं नसतीं नि आपला असा घोटाळा होता ना'

मुंबईसारख्या शहरात पाहुण्यांची पडाळ होऊन राहिलेली आमची ती चिमुकली जागा आम्हाला किती अडचणीची होत असेल ह्याची कल्पना मुबईत बिऱ्हाड करून राहिलेल्या माणसाखेरीज इतराना येणें कठीण आहे.

बरे, पाहुण्यापाहुण्यात देखील अतर असते पाहुणा म्हणून येऊन दुसऱ्याच्या घराचा कबजा आपल्याकडे घेणारे जे पाहुणे असतात त्याना आम्ही विनोदानें रावण-पाहुणे म्हणत असू. त्याच्यांचें जातीतला हा छगन होता सिधूचा चुलत मामेभाऊ म्हणून त्याने आपला परिचय करून दिला आणि आमच्या घरात प्रस्थान माडलें दोन तीन दिवसातच त्यानें आपली चुणूक दाखवायला सुरुवात केली जातिवंत ... तो! घर तर आपल्या ताब्यात घ्यायचेंच, पण ते सरळ डोक्यावर घ्यायचें, असा त्याचा बाणा दिसला.

कोठल्याशा हपिसात त्याला 'टेपरवारी' नोकरी लागली म्हणून त्याचें मुबईत आगमन झाले आला तो एका बॅगनिशी आंगावर तरी काय, एक नेहरू शर्ट आणि पायजमा एवढेंच! डोक्याला कांही नाहीं कोटही नव्हताच घरांत शिरला तेव्हा 'शाम चुनरिया दे दे मोरी' ही चीज त्यानें सुरू केली, ती दोन दिवस झाले तरी सपेना मला वाटलें अस्ताईपर्यंत गाडे आलें कीं तिचा अस्त होईल!

पण छे, बिलंपत आणि तोडी का काय म्हणतात तेही प्रकार त्यानें त्या चिजेचे केले. ती संपल्यावर त्यानें-'सुदरी मोरी खां-' असें कांहीं तरी आरंभलें आघोळीची मोरी पाहिली रे पाहिली की त्याला 'मोरी' असलेल्या कित्येक चिजा आठवत! गंमत अशी कीं मोरी तुबावी त्याप्रमाणें त्याचे पालुपद 'मोरी' पर्यंत आलें कीं थबके आणि तेथून पुढें सरळ तानबाजीला प्रारंभ! मधून मधून त्याचें सारीगम व्हायचें. घरांतल्या पेट्या, कपाटें, दारें इत्यादिकांवर कधीं हातांचा तर कधीं काठ्यांचा

तबला चाले. मध्येंच तराण्याचे बोलही गडगडत येत हपिसांत केव्हां जाई आणि केव्हां परत येई त्याचा कांहींच नेम नसे. एवढें खरें, कीं येई तेव्हां दोस्तांचें एक टोळकें बरोबर असायचे. मग चहा, चिवडा, सांजा, सिगारेट वगैरेंचा घाऊक पुरवठा घरातून करावा लागे टोळक्यातले सगळेच दोस्त एखाद्या गायनवादन विद्यालयाचे विद्यार्थी होते कीं काय कोण जाणे ? कारण, जेव्हा पाहावें तेव्हां त्याचीही गळा काढून स्वर भरण्याची कसरत चाललेली. थोडक्यात सांगायचें म्हणजे तो एक जिवत सूड होता !

मुबईत आणखी एक पचाईत असते शेजारी शाततेचे भुकेले असतात. आपल्या घरात असा काहीं जल्लोष ऐकला, की ते स्वस्थ बसत नाहीत त्या ध्वनीच्या रूपानें जी उष्णता बाहेर पडते तिचा चटका त्याच्या डोक्याना बसतो मग सूचना, ताकीद, धमकी, तक्रार, पोलीसकडे अर्ज, आणि मालकाला नोटीस हे प्रकार क्रमाक्रमानें पण झपाट्याने होत जातात. अर्थात् छगनचा धागडधिंगा घरात वेळीं अवेळीं चालू झालेला पाहून मला हीही भयकर स्वप्ने दिसू लागलीं. आठ दिवसांत आम्ही दोघेंही त्याच्या पिलू-झिंजोटीला कटाळून गेलों. लवकरच आम्हांला ‘ जोगी ’ व्हावे लागणार असा रंग दिसू लागला !

एक दिवस मी हपिसांतून जरा त्रासून घरी आलों होतों दारांत पाऊल ठेवल्याबरोबर तबल्याचा जो धूमधडाका दाणकन् माझ्या कानावर आदळला त्यानें माझें मस्तक भडकले मी तसाच सिंधूकडे गेलों आणि तिला वरीलप्रमाणे सरळ प्रश्न केला तिलाही छगनविलाम तापदायक वाटू लागले होते, हें ऐकून मला जरा बरें वाटलें पण तिनें सुचवलेला उपाय मात्र कुचकामाचा वाटला

“ वास्तविक त्याने होऊनच एव्हांना दुसरीकडे खोली पाह्यला हवी होती दुसऱ्याच्या ओसरींत आपली पथारी किती दिवस पसरून ठेवायची माणसानें ? ” मी तिला म्हणालो

“ नुसती ओसरी पुरती मेल्याला तर नसत एवढं वाटल. .... ” तिनें दुजोरा दिला.

“ तेंच तर वाईट आहे रात्रीं बारा बारा वाजेपर्यंत ह्या चांडाळचौकडीचा हा दंगा. अगोदरच सारा दिवस कष्ट करून जीव गळून जातो. त्यांतून जरा डोळे मिटावे तों ह्यांचा उच्छाद कस कराव माणसाने ? ”

“ आहे खराच बाई जरासा द्वाड लहानपणापासून ! ” ती अर्धवट कौतुकानें आणि

अर्धवट रागानें म्हणाली. कसें केलें तरी माहेरचें माणूस ना तें! त्याला एकदम तोडून कसें टाकायचें ?

" तूच पाहा. आज हपिसाला जायला निघालों तों मोजे सापडेनात. जुने फाटके मोजे घालून जाव लागले. शर्टच्या गुंड्याची तीच गत. दोन विजारींच्या चिंध्या झाल्याच आहेत. बुटाची वादी एक धड असेल तर शपथ. माझे सगळे कपडे तो वापरतो नि वाटेल तिकडे फेकून देतो पुस्तकाच वाटोळ केलन्, घड्याळाची तबकडी काल फोडलीनच घरात टेनीस खेळून तूच सांग, सहन तरी किती करायच माणसान ?"

" मला का दिसत नाहीं हे सारं ? मी तर म्हणते, आजच त्याला जा म्हणून सागाव!" सिंधू सहानुभूतीच्या स्वराने म्हणाली.

आम्हीं रात्रीं जेवताना ही गोष्ट काढली. मी शक्य तेवढ्या सभ्यपणानें त्याला विचारलें, " बरं जमलय् तुझ छगन नोकरीची मुदतही वाढेल कदाचित्. तेव्हा म्हटल दुसरीकडे बिऱ्हाड करण्याचे बेत असतीलच..."

" छे छे छे!" त्यानें तात्काल खुलासा केला, " कुणीं सागितलं हें तुम्हांला मामा ? अगदी काळजी नका करू तुम्हीं!"

तें ऐकून माझ्या हातातला घास पटकन् ताटांत पडला

" तस नव्हे छगन," माझा वायबार फुकट गेलेला पाहून सिंधू म्हणाली, " ह्या दिवसात किनई सासूबाई राहायला येतात इथें! तिकडे वऱ्हाडांत उन्हाळा फार. मुबईत बरं वाटत त्याना. त्याच पत्र आलंय् दोन चार दिवसात येईन म्हणून. तेव्हां म्हटलं एखाद दोन खोल्या त्याच्याकरता रिकाम्या ठेवायला हव्या!"

" हो, आई यायची म्हणजे मोठ थोरल लटाबर असायचच तिच्या बरोबर!" मी सिंधूच्या सपादणींत मसाला भरू लागलों.

" अग पण सागितला कुणीं हा वनवास ?" छगननें बेधडक सल्ला दिला, " सरळ कळवून टाका त्यांना येऊं नका म्हणून. काय चमत्कारिक माणसं हीं! मुबईत दोन खोल्या म्हणजे काय चेष्टा वाटल्या ह्यांना ? दुसऱ्याची गैरसोय तरी किती करावी माणसानें ? छे, मऊ लागल कीं चालले कोपरानें खणीत!"

छगनचा हा बेशरमपणाचा उपदेश ऐकून माझ्या डोळ्यासमोर काजवेच चमकले. तो कोणाबद्दल असें बोलत आहे ह्याची जाणीव करून देण्याकरतां त्याच्या दोन मुस्कटांत याव्या असेंही मनांत आलें. पण सिंधूकडे पाहून



मूग गिळले आणि ‘ कां, कसे निर्लज्ज आहेत आपले बधुराज ? ’ अशा अर्थाचा एक दृष्टिक्षेप तिच्याकडे टाकून मी स्वस्थ राहिलों



तें ऐकून माझ्या हातांतला घांस पटकन् ताटांत पडला.

“ माडीवरच्या खोलीला रंगही द्यायला हवाच एकदा. किती वर्षांत तिकडे पाह्यल नाहीं मालकांनीं ! ” सिधूनें दुसरी एक सबब काढली.

“ काय करायचा आहे रंग ? आपला रागरंग चांगला असला म्हणजे झालं ! ” छगनने त्यावरही सफेती मारली आणि वर फिदी फिदी हसला

सिंधू बिचारी अगतिक होऊन माझ्या तोंडाकडे पाहू लागली

“ हें पाहा छगनलाल, ” मी घसा खाकरून, पकडवॉरंट दाखवणाऱ्या एखाद्या पोलीस अधिकाऱ्याची ऐट आणून म्हणालों, “ तुम्ही पाहातांच आहां मला हल्लीं किती काम असत तें ! क्षणाची फुरसद नसते. त्यांतून डोक झालय् हलक. केव्हा गरगरायला लागत त्याचा नेम नाहीं. डॉक्टर कालच स्पष्ट म्हणाले, तुम्ही एखाद्या निवान्त स्थळीं जाऊन कांहीं दिवस विश्राति घ्याल तर बरं ! तेव्हां मीं म्हटलं

आपलं घरच निवान्त केलं म्हणजे झाल नाहीं, तुम्हीं आम्हाला सोडून जावं असं एरव्हीं वाटलच नसतं आम्हांला, पण डॉक्टराच्या सल्ल्यापुढें उपाय नाहीं. बरं, तुम्ही घरांत असलांत म्हणजे चार मडळी यायचीच तुमच्याकडे. मग मला कशी स्वस्थता मिळावी बरं ? ह्याचा तुम्हींच विचार करा...... "

" ह्यात्तिच्या ! " छगननें एकदम पवित्रा बदलला, " एवढस सागायला आढेवेढे किती घेतलेत मामा ? ह्याच्या अगोदर असं सांगितल असतत, नव्हे नुसती खूण केली असतीत तरी आम्हीं केव्हाच गाशा गुडाळला असता. राघो भरारीसारखे भुर्रकन् निघून गेलों असतों. छे छे ! फारच भिडस्त माणस तुम्ही ! "

त्याचा मानभावीपणा पाहून मी सर्दच झालों

" तस नव्हे रे, " सिधूने सावरून घेतलें, " तुझ्या सारख्याला जा म्हणून सांगायच जिवावर यायचच कुणाच्याही ! "

मीही सुटकेचा एक निश्वास टाकला. पण तो पुरा बाहेर पडला नसेल तोंच तिच्या बधुराजानीं शका काढली,

" सगळ खर मामा, पण आम्ही जाणार कुठें ? "

झालें ! आम्ही आशेच्या पखावर बसून अस्मानात भराऱ्या मारीत होतों ते धपकन् पुन्हा खाली आपटलों !

" अ ! मुबईत जागेला काय तोटा ? " मीं थापा देण्यास सुरुवात केली, " बरं पुन्हा अगदीं आपल्या खिशाच्या प्रमाणात खोल्या मिळतात. तिकडे चौपाटीच्या बाजूला हवेशीर दोन खोल्याचा ब्लॉक बघावा एखादा. इकडे हल्लीं फार खिचडी झाली आहे नि त्यातून तुला थोडी दम्याची भावना आहे. . "

हेतु असा की त्यानें शक्य तेवढी दूर जागा पाहावी !

" खरं म्हणाल तर जागा पाहाण्याच्या कामात मी धांदरटच आपल्याला मुबईत अगोदर पत्तेच सापडत नाहींत लवकर कित्येक वेळा आपण हरवलों आहों असच वाटायला लागत बुवा पण तुम्हीं माहिती दिलीच आहे, तेव्हां पाहातों जरा हिंडून इकडे तिकडे. "

आम्हांला त्या इकडे तिकडेचा अर्थ चांगला समजला. कारण सिंधूच म्हणाली, " त्याच लक्षण दिसत नाहीं धड ; कसली कपाळाची जागा पाहाणार तो. आपल्यालाच त्याच्याकरतां एखादी खोली हुडकून काढायला हवी. "

दुसऱ्या दिवसापासून फावल्या वेळात मी जागेच्या तपासांत हिंडू लागलों.

छगनची ब्याद घालवण्याकरता मीं कितीही बतावणी केलेली असली तरी मुंबईत आपल्या मनाजोगती जागा शोधून काढणें किती प्रयासाचें काम असतें हें वाचकांपैकीं पुष्कळांना ठाऊक असेलच. चार पांच दिवस पायपीट केल्यावर सॅंढर्स्ट पुलाजवळच्या एका लहानशा चाळींत मला दोन खोल्यांचा एक ब्लॉक बेताच्या भाव्यात सापडला. रिकामा नव्हताच तो, पण लवकरच व्हायचा होता. चाळीची मालकीण चिमाबाई म्हणून कोणी अक्कलकोटकरच्या बाई होत्या. त्यांनीं मला सांगितलें,

" ब्लॉक रिकामा व्हायचाय् केव्हां तें ताम्हण्यांना विचारा. "

" ताम्हणे कोण ? "

" ब्लॉक मधले भाडेकरी ! "

" अस्सं अस्सं ! "

मीं लगेच ताम्हण्याची गाठ घेऊन ते ब्लॉक केव्हां खालीं करणार ह्याची चौकशी केली.

ते म्हणाले, " आम्हीं काय, केव्हांच खालीं केला असता ; पण... "

" पण काय ? "

" आमच्या चिंगीच लग्न जमेना हो अजुनी ! "

मग त्याच्याकडून सारी हकिगत समजली. ती मडळी मुळीं चिंगीला स्थळें पाहाण्याकरताच मुबईत बिऱ्हाड करून राहिली होती. ताम्हणे म्हणाले, " पाहा बुवा, तुम्हाला त्रास पडेल जरासा पण आम्हांला जरा हातभार लावलात तर होईल जागा लवकर रिकामी. हो तुम्हीं स्थळ पाहातां, आम्हीही स्थळंच पाहातों आहोंत. हीः हीः ही ! "

त्यांचा कोटीक्रम मला आवडला नसला तरी गरजवताला अक्कल नसते ह्या न्यायानें मीं त्यांच्याकडून चिंगीची पत्रिका आणि फोटो मागून घेतलीं व दुसऱ्या दिवसापासून स्थळें हुडकण्याकरता आमची भ्रमती सुरू झाली !

तीन चार दिवसांतच माझ्या खटपटीस यश येण्याचा रंग दिसू लागला. एक ऱ्यापैकीं स्थळ सापडलें मटगे का कायसेंसें आडनांव होतें त्यांचें त्यांच्या मुलाचें आणि चिंगीचें टिपण जमलें मुलाला मुलगी पसंत पडली, हुंड्यापाड्याचीं बोलणींही होऊन गेलीं.

ताम्हण्यांना माझ्या हुशारीची धन्यता वाटली. " बघा हो " ते म्हणत, " आज तीन

महिने मुंबईंत भटकतों आहोंत, पण कांहीं उपयोग नाहीं नि ह्यांना पाहा, जसं कांहीं सांगून याव अस पटकन् स्थळ सापडलं!"

ते असें म्हणाले कीं मला मूठमर मांस चढे व हरकत नाहीं आपल्याला दहा मुली झाल्या तरी, अशी फुशारकीही वाटे.

परंतु ह्या साऱ्या आनदात एक दिवस मटग्यांनीं मिठाचा खडा टाकला. मुहूर्त ठरवण्याच्या गोष्टी निघाल्या असता ते अगदी आर्जवी स्वरानें म्हणाले, "हें पाहा मडळी, तुम्हाला सागायला शरम वाटते मला. पण आमच्या हिनें एक नवीनच भानगड उपस्थित केली आहे"

"काय ती?" आम्हीं घाबरून विचारलें. माझ्या उरांत तर धडधडच सुरू झाली.

"मुलीच लग्न जमल्याशिवाय मुलाच लग्न करायच नाहीं असा शास्त्रार्थ काढलाय् बायकांनीं!"

"म्हणजे? मुलगी लग्नाची आहे वाटत आपली?" आमच्या शास्त्रीबुवांनीं प्रश्न केला.

"होय ना! आज दोन वर्ष स्थळ पाहात आहोंत तिला. परवां एक स्थळ मिळालं मनासारखं. अगदीं जमल्यासारखच होत पाहा, म्हणून तर मीं तुम्हांला होकार दिला नि बोलण सुरू केलं पण काल त्या मडळीनीं चिठ्ठी पाठवली, कीं मुलगा घरांतून कुठें बेपत्ता झाला काय कराव, मोठी पचाईत झाली ही!"

"तिच होईल निवारण परमेश्वराच्या कृपेनें" शास्त्रीबुवांनीं आशिर्वाद दिला, "पण आपण हा शास्त्रार्थ काढलाय्, त्याला ग्रथांचा आधार नाहीं कुठें..."

"नसेल, पण बायकाच्या शास्त्रार्थाला अर्थ नसला तरी तो कुठल्याही शास्त्रापेक्षां बळकट असतो! मोडतां येत नाहीं!"

त्यांच्या एकंदर बोलण्याचा मथितार्थ हाच, कीं आम्हीं त्यांच्या मुलीकरतां स्थळ पाहायला बाहेर पडावें. त्यानीं ताम्हण्यांच्या शिफारसपत्राचा दाखला पुढें केला आणि उघड म्हटलें, "मामासारखा माणूस असल्यावर स्थळाना काय तोटा?" त्या शाबासकीचें हें पर्यवसान पाहून मी गार झालों. आतां हीं स्थळें पाहाण्याची मोहीम आवर्त दशांशासारखी कोठवर वाढत जाणार ह्याचीच मला धास्ती वाटू लागली.

पण सुदैवानें ती तशी लांबली नाहीं. मटग्यांच्या मुलीला स्थळ सापडलें, आणि ताम्हण्यांच्या मुलीचाही मुहूर्त लौकरच ठरला. दोन्हीं कार्यें पुण्याला व्हायचीं ठरल्यामुळें ताम्हण्यांनीं ब्लॉक खालीं केला. चिमाबाईनीं माझ्याविषयीं फार बारकाईनें विचारपूस

केली. पण ताम्हण्यांनीं तोंड भरून शिफारस केल्यामुळें मला जागा द्यायला त्या तयार झाल्या. तरी एक महिन्याचें भाडें मला भरावे लागलेंच. पण छगनचा ससेमिरा आपल्या पाठीमागचा एकदाचा सुटणार ह्या आनदाच्या भरात मला त्याचें काही वाटलें नाहीं !

* * *

मीं जागा ठरवल्याचें सांगितल्यावर छगन हर्षभरानें माझ्याशी हस्तांदोलन करीत म्हणाला, " खरंच का मामा तुम्हीं एवढी तसदी घेतलीत माझ्याकरतां ? किती किती चागले आहांत मामा तुम्ही ! माझ्या कातड्याचे जोडे करून तुमच्या पायांत घातले तरी तुमचे उपकार फिटणार नाहींत "

तसा बोलण्यात मोठा फाकडा होता गुलाम !

दुसऱ्या दिवशीं त्यानें बांधाबांध सुरू केली आणि ती सोडतां सोडता मी मेटाकुटीला आलों. तुम्ही म्हणाल, " सागितल कुणी त्याच सामान सोडायला ? " पण न सोडून काय करू ? आपलें तें आपलेच आणि दुसऱ्याचें तें आपलेच, अशा तऱ्हेचा विलक्षण ' आपलेपणा ' छगनच्या ठिकाणी असल्यामुळें त्याने माझ्या विजारी, कोट, बूट, शर्ट, वगैरे किती तरी जिनसा चुकून (!) आपल्या सामानांत बाधाव्या आणि मी त्या काढून ठेवाव्या असें चाललें होते त्या दिवशी !

शेवटीं निरोप घेतांना तो म्हणाला, " बरं आहे येतों मडळी. सिंधे, ए शिंध्या, येतों बरं. फार प्रेमळ माणस तुम्ही. घरातून पायदेखील हलत नाही माझा दिवस कसे चुटकीसारखे मजेंत गेले ! "

" बरोबर, तुझे गेले खरेच ! " सिंधू हसत म्हणाली

" बघ ह सिंधू , टोमणा देते आहेस भावाला भाऊबिजेला निघेल याचा वचपा ! ध्यानांत ठेव. " असा विनोद करीत स्वारी एकदाची व्हिक्टोरियात बसली निघतांना इंग्रजी पद्धतीप्रमाणे त्यानें आमच्याकडे रुमाल फडकावला ! तहाचें निशाणच वाटलें तें !

तो गेल्यावर आम्हांला एकदा बाजार उठल्यासारखे ह्यायसे झालें. त्या निवात वातावरणांत मला विलक्षण हुरूप वाटू लागला आणि साचून राहिलेल्या कामाचाही मीं तावडतोब फडशा पाडला इतक्या दिवसांच्या दगदगीनतर माझ्या मनाला असें मोकळें वाटल्यास नवल नव्हतें सिंधूनेही हा हां म्हणतां घरांतला पसारा आवरून घर कसें आरशासारखें स्वच्छ केलें.

पण आमचें हें सुख अल्पजीवि ठरलें चार पांच दिवसांनीं एका सकाळीं आम्ही चहाचे घुटके घेत असतां, " काय, कसं काय आहे मामा ? चिंधे, ए चिंध्या, काय

चाललं आहे ?" अशा आरोळ्या ठोकीत छगनलाल आमच्या पुढें दत्त म्हणून येऊन उभे राहिले! सामान बरोबर होतेंच! आम्ही दिङ्मूढ होऊन पाहात राहिलों. विजारीच्या खिशात चाचपल्यावर तो म्हणाला, " अरे, परटीच्या कपड्यात गेल वाटतं पाकीट? असंच दिसतंय्! बरं तेवढे गाडीवाल्याला आठ आणे देऊन टाकतां मामा?"

मला मुकाट्यानें आठ आणे काढून द्यावे लागले. छगन हसत हसत माझ्याच चहाचा कप तोंडाला लावीत म्हणाला, " तुम्हांला ओढच फार माझी!"

" म्हणजे? करमल नाहीं की काय तुला तिथें?" सिंधूनें विचारलें

" न करमायला काय झाल? पण तुमची ती चिमाबाई राहू देईल तेव्हां ना!"

" का?"

" शेजारच्या कुटुबवत्सल भाडेकऱ्यानी ओरड केली म्हणे! तळमजल्यावरच्या दोन बायानीं तर जागा खाली करण्याची नोटीसच दिली तिला!"

" अग बाई, असले कसले हे भाडेकरी?"

" त्यांची डोकी उठू लागली आमच्या सगीतामुळें. गाढवच ती. त्यांना काय रसिकता असणार? गाण आणि रडगाण, त्याना सारखीच"

खरें म्हटलें तर मला त्या भाडेकऱ्याची कीव वाटली. चार दिवस तरी त्यानीं ह्याच्या शेजारीं कसे काढले असतील देव जाणे! पण ते काहीं असलें तरी चिमाबाईनी एक महिन्याचे भाडे आगाऊ घेतलें होते त्याची काय वाट? मीं ती गोष्ट छगनला सागितली. तेव्हा त्यानें खुलासा केला, " नमस्कार असो महाराज तुमच्या त्या चिमाबाईला! साक्षात् झाशीवाली लक्ष्मुम्बाईच ती. ती का माझ ऐकणार?"

हें सागताना छगनचा स्वर बदललेला वाटला. कशाला तरी तो भीत असावा असें दिसत होते मी विचारले,

" पण कायद्याप्रमाणें भाड घेतल्यावर..."

" ती म्हणाली, कायदा बियदा ओळखीत नाहीं. ज्यानें जागा ठरवली त्यानें येऊन राहाव तुमच्यासारख्या टोळभैरवाना जागा द्यायला माझी चाळ कांहीं वाटेवर पडली नाहीं तुम्ही मुकाट्यानें चालते व्हा!"

" मग तू भाड परत मागायच होतस!"

" मागितल; तेव्हां ती मुलुखमैदान गरजू लागली, कोणत्या तोंडानें पैसे मागतोस रे मेल्या? तुझ्याजवळून थोडेच पैसे घेतलेत मीं? हा पाहा बाई काय चमत्कार तो! वाटचा चोर इथें घुसला. छेलछबेल्या करून चाळ डोक्यावर घेतलीन् नि वर तोंड

पसरून पैसे मागतोय् ! कुटुंबवत्सल बिन्हाडं राहाताहेत इथें ह्यांची कांहीं लाज मेल्याला ? त्याला वाटलं कामाठीपुराच आहे हा. शौचे, अहो शौचे, पाहातां काय ? ह्याला धक्के मारून बाहेर काढा अगोदर. होतोस कीं नाहीं बाहेर, कीं आणू पोलीसला बोलावून, आं ? आगतुक मेला ! जा तुझ्या मामांना घेऊन ये म्हणजे सागतें काय तें..."

पुढचा प्रकार सागताना छगन ओशाळला चिमाबाईनें स्वत.च हात धरून त्याला बाहेर काढलें होतें आणि त्याचें सामान रस्त्यावर फेकून दिलें होतें. ह्यामुळें चिमाबाईची त्याला चांगलीच दहशत बसलेली होती हे उघड दिसलें तिच्या हातची एखादी चापटपोळीही खाल्ली असावी स्वारीनें !

सिंधूला मात्र फार वाईट वाटलें. ती मला एकीकडे म्हणाली,

" सपलाच म्हणायचा तुमचा निवान्तपणा आता. पुन्हा आली ही कर्मकटकट ! कुठून ह्या कार्ट्याला मुंबईत नोकरी लागली कुणास ठाऊक ! बरी तर बरी टेंपरवारीच आहे. आता एवढ बरीक कराव, चार गोड शब्द बोलून चिमाबाईकडून तेवढे भाड्याचे पैसे परत आणावे."

पण चिमाबाई चिमाजी अप्पांच्याही बारशाला जेवलेली. तिनें साफ सांगितलें, " तुम्ही येऊन राहा. तुम्हांला कोण नको म्हणतय् ? पण भाड परत द्यायचा आमचा रिवाज नाहीं. वाटल्यास खुशाल कोर्टात जा ! "

विचारान्तीं मीं तिनें दाखवलेल्या पहिल्या मार्गाचा अवलब केला. पुस्तकें आणि कपडे घेऊन मीच एक महिनाभर त्या नवीन ब्लॉकमध्ये राहायला गेलों त्या चाळीच्या प्रशान्त वातावरणांत मला बरें वाटू लागलें त्या चाळींत त्याची शोभा झालेली असल्यामुळें छगन तिकडे फिरकत नसे. मी चैनींत होतों सिंधूला मात्र घर कसें खायला उठलें असेल हें मनात आलें म्हणजे खेद होई.

पण सिधूकडून मला एक दिवस समजले, कीं चिमाबाईनीं छगनला दिलेली बाळगोळी अगदींच वाया गेलेली नव्हती. त्याच्या आचारविचारांत झपाट्यानें फरक घडून येत होता एक महिन्यानें जेव्हां मीं त्याला पाहिलें तेव्हां सिंधूचे म्हणणें मला पटलें. छगन आतां इतका बदलला होता कीं, नोकरी सुटून तो आपल्या गांवीं परत गेला तेव्हां आम्हांला तितकें हायसें वाटलें नाहीं !






डेक्कन जिमखाना कॉलनींत राहाणाऱ्या माझ्या मित्रांना मी नेहमीं म्हणे, "फार माणुसघाणे लोक तुम्ही. शेजारीं कुणी तडफडून मरायला लागला तरी पाणी हवं का म्हणून सुद्धा विचारायचे नाहींत. मग आसपास कोण राहातय् याची कुठून दखल असणार ? दोन भाऊ शेजारी नि भेट नाहीं जन्मभरी—अशी तुमची गत. तेंच आमच्या नारायण पेठेंत पाहा गेटावर टांगा उभा करा नि बापू गोखल्याच घर कुठच म्हणून वाटच्या चोराला विचारा. चोरच काय पण पांच वर्षांच शेंबड पोरदेखील आणून सोडील नेमक माझ्या घरीं."

"बापूराव," ते म्हणत, "राहाण्याची स्टाइलच निराळी असते एकेक ठिकाणची आमची ही ब्लॉक सिस्टीम् अशीच असायची. बाकी, पाहाण्यासारख असेल त्याच्यावर लक्ष ठेवतोंच म्हणा आम्हीं"

"ब्लॉक कसले हे ?" मी चिडून म्हणे, "ह्यापेक्षां नाकपुड्या बऱ्या. हो, इकडचा वारा तरी तिकडे जातो त्यांतनं"

"नि शेजाऱ्याच्या बबाचा धूरही आपल्या घरांत वावरतो तुमच्या नारायण पेठेंत !" ते उलट खिजवायचे. मला त्याचें तें सारें ढोंग वाटायचें पण एक दिवस नारायण पेठेचा जो मला विचित्र अनुभव आला तो आठवला म्हणजे वाटतें त्यांची "स्टाईलच" बरी. तीच गमत सांगणार आहें आज मी.

त्याचें असें झालें. आमच्या हपिसात एकदा कामाचें तुफान सुरू झालें आणि

तें केव्हां कमी होणार ह्याचा अंदाजच लागेना. कामाच्या फायलींचे ढिगारे घरांतदेखील चहूकडे पसरलेले होते रात्रीच्या जागरणामुळें प्रकृति खालावत चालली होती. पण सौ इदूजवळ त्याबद्दल ब्रही काढण्याची सोय नव्हती कारण कोणाचें दुखणें म्हटलें म्हणजे बाईसाहेबाच्या आगांत जें वारें संचरे त्यामुळें त्यांचीच भ्रमिष्टासारखी स्थिति व्हायची तेव्हां ह्यावेळीं मी जर कांहीं बोललों असतों तर माझें दुखणें विसरून त्यांच्याकरता औषधपाणी करण्याची माझ्यावर वेळ येती!

अशा स्थितींत सौ. च्या माहेरीं तिच्या भाचीचे लग्न निघाल्यामुळें ती जेव्हा चार दिवसाकरता बेबीसह गांवाला निघून गेली तेव्हा विरहाची कल्पना येऊनही मला तिनकेंसें वाईट वाटले नाहीं. उलट, ही बरी सवी आली, आता जरा स्वस्थपणानें डॉक्टर बिक्टरला दाखवून औषधपाणी घेता येईल ह्या विचारानें समाधानच वाटलें

ती गेल्याबरोबर मीं भातखडे डॉक्टरला बोलावलें. माझा शाळामित्र होता तो. वैद्यकीय सल्ल्याच्या कामात त्यानें चागलें नांव मिळवलें होतें. माझ्या शारीरिक नकाशाची सर्व बाजूनीं पाहाणी केल्यावर तो गभीरपणानें म्हणाला,

"तुझा ग्यांगलिया बरोबर वर्क करीत नाही. गॉल ब्लॅडरही च्योक झालीशी वाटते. रक्तांत ल्यूकोसाईटस् फार वाढले आहेत!"

"अरे तू तर मोटर एजिनच्या गोष्टी बोलतो आहेस"

"नि रिफ्लेक्सेसही बरोबर नाहीत .."

"अरे बाबा, तुझ्या मेडिकल कालेजांतून हमरस्त्यावर येऊन बोलशील कीं नाहीं काय ते! काय बोललास त्यातल एक अक्षरही कळल नाहीं मला. बोल, किती दिवसांचा सोबती आहें मी?"

"असा घाबरतोस काय? कामाचा बोजा फार पडल्यामुळें तुला जरासा शीण आलाय्."

"अः! हें तर शेजारचा रामभाऊदेखील सांगेल. रोज पाहातोच आहे मला तो सकाळीं नवाला हपिसात जाताना नि रात्रीं नवाला घराच दार ठोठावतांना."

"एक दिवस तरी अगदीं कम्प्लीट रेस्ट घ्यायला हवी—पूर्ण विश्राति." त्यानें माझ्या डोळ्याचीं बुब्बुळें फिरवून पाहिल्यावर सल्ला दिला.

"पूर्ण विश्राति म्हणजे?"

"स्वस्थ निजून राहायच उठायच म्हणून नाहीं. खाणं पिण वगैरे सगळं

कांहीं आंथरुणांत. अनायासें तुझी वाइफ् गेलीच आहे माहेरीं. आज सध्याकाळींच गवळ्याला सांगून टाक उद्यां दूध नको म्हणून, नाहीं तर तो येईल पहाटे उठवायला. गादीवर दहा फूट पसर. आपोआप जाग येऊन उठावस वाटेपर्यंत जागचा हलूं नको. सारा दिवस लोळून काढायचा गणूला माझ्याकडे पाठीव. चहाची वगैरे व्यवस्था मी करीन."

इतकें बडबडल्यावर भातखडे जायला निघाला.

"नि औषध ?"

"उद्या तुझ्या सिस्टिमला विश्रांति मिळू दे. मग पाहू औषधाचं."

"बरं आफिसला चिठ्ठी ?"

त्यानें चिठ्ठी लिहून दिली मीं ती लगेच रामभाऊच्या हातीं रवाना केली भातखड्याचा उपाय अमलात आणायचा मी निश्चय केला. पण म्हणतात ना, माणसाची आस आणि दैवाचा फास ह्यांचे व्यस्त नाते असायचेंच. तस्से व्हायला लागलें सध्याकाळीं दाम्या गवळी आलाच नाहीं. आतां तो लेकाचा पहाटे येणार, दार ठोठावणार आणि मला उठवणार !

पण ह्यावर मी एक तोड काढली दाम्या अगदीं अक्षरशत्रू नव्हता. डोक्यानेंही बराच तल्लख. तेव्हा मीं एका कागदावर त्याच्याकरता जाड्या अक्षरांत सूचना लिहिली, "आज कांहींही घेणें नाही. आवाज न करता परत जावे" आणि ती नोटीस दारावर चिकटवून दिली. म्हटलें, अनायासे सर्वच फेरीवाल्याना ती लागू होईल

इतक्यात राणू शिंदे दारावरून जाताना दिसला त्याला मीं सहज विचारल, "काय रे, आमच्या तक्रारीच काय झाल ? कनेक्शन् तपासायला केव्हा येता ?"

वीज पुरवठा कपनीचा तो मुख्य वायरमन् होता. माझ्या घरातील विजेच्या फिटिंगमधून कोठेतरी वीज गळत असल्याबद्दल मीं कपनीकडे तक्रार केलेली होती. आठ दिवस झाले तरी कपनीचा जबाब आला नाहीं म्हणून राणूला खुलासा विचारणें प्राप्त झालें राणू म्हणाला,

"त्येचा हुकूम आजच दिलाय् साह्यबांनीं. उद्यां मानस लावून देतों तुमच्याकडं कामाला."

"उद्यां ?"

"व्हय जी, उद्याच."

म्हणजे बरी मला बुद्धि झाली राणूला विचारण्याची. नाहीं तर उद्यां तीं माणसें

येऊन त्यांनीं झोपेचें चांगलें खोबरेंच केलें असतें! मीं राणूला जरा अजीजीनें म्हणालों,

" उद्यां मला फार काम आहे रे. सारा दिवस मी बाहेरच. तेव्हां परवां माणसें पाठवलींस तर..."

" अरारारा! ह्यो घोटाळा झाला "

" घोटाळा ? "

" तर व ? तुमाला सायबाकडं लेखी कळवायला हवं "

" काय करायच एवढ्याशा गोष्टीकरता लेखी बिखी ? तुझ्या हातांतली गोष्ट आहे!" मीं राणूच्या हातात सिगरेट देता देतां लाडीगोडी केली

" बराय् पगतों सांगूनशानी..." असें आश्वासन देऊन राणू निघून गेला. एक बंपरभर पाणी पिऊन मीं दिवे मालवले आणि झोपीं गेलों.

पहाटे सहाची वेळ दाराची कडी खाड खाड वाजायला लागली. मी दचकून जागा झालों. खाली जाऊन कडी काढून पाहातों तों दाम्या दुधाची बरणी हलवीत समोर उभा! दारावरील नोटिशीकडे बोट दाखवीत मी त्याच्या आंगावर खेकसलों,

" काय रे दाम्या, वाचायला येत नाही का ?"

" ते वाचल पण साहेब, मीं परवां गुप्त पोलिसाची एक गोष्ट वाचली. तींत त्या जॅकनें आपल्या धन्याचा गळफासाने खून केल्यावर दारावर अशीच चिठ्ठी डकवली व्हती बघा तेव्हां म्हटल तुम्हांला डोळ्यानीं पाहून खात्री करून घ्यावी! हो. शिमग्याचे दिवस आहेत..."

" बरं बर, आतां आणलच आहेस दूध तें ठेव. नि हें पाहा, संध्याकाळीं येऊं नको शिमगा करायलाच जा "

तो उड्या मारीत निघून गेला. मी परत आथरुणावर येऊन आडवा झालों.

जरा डोळा लागतो न लागतो तोंच घड्याळाचा ठणाणा अवचित सुरू झाला. अरेच्या! आदल्या दिवशीं गजराकरतां दिलेली किल्ली पुरी संपली नव्हती वाटतें? चवताळून उठलों, तें घड्याळ तसंच उचललें आणि खिडकीच्याबाहेर फेकून दिलें. गुलाबी झोप घ्यावी म्हणून पुन्हा डोळे मिटले

साताच्या सुमारास खालीं दारावर धक्के! हरे राम, हीं दारें वाजतात तरी केवढ्यानें! " दारान् आपत्याय " असें कोणीसें म्हटलेंय् तें ह्याच दाराना उद्देशून असलें पाहिजे. धक्के मारणाऱ्याच्या बेचाळीस पिढ्या मनातल्या मनात उद्धारीत मी खालीं गेलों

आणि दार उघडलें गेटावरचे हवालदार हातांत माझेंच घड्याळ घेऊन उभे होते. हसत हसत सलाम ठोकून त्यांनीं विचारल, " चोरीबिरी झाली नाहीं ना रावसाहेब आपल्या घरांत ?"

" झालीय् " मी त्रासिक स्वरानें उत्तर दिलें, " पण घड्याळाची नाहीं झोपायची !"

" हें काय बुवा आम्हांला माहीत ? शेजारच्या महादेवरावांच्या बागेंत घड्याळ पडलेल सापडल मी तें ओळखल तेव्हां म्हटल तुम्हांला विचाराव. "

खरें म्हटलें म्हणजे तेच घड्याळ त्याच्या डोक्यांत हाणावें इतका मला संताप आला. काय चौकस ही पोलिसचीं माणसें ? आमचे घाड्याळ म्हणे बागेंत कसें जाऊन पडलें ? आणि पर्वतीवरच्या मूर्ति चोरट्यानीं पळवल्या तेव्हा कुठें गेली होती त्यांची हुषारी ? फासकट फुसकट गोष्टीचा कीस काढतील आणि त्यांच्या डोळ्यादेखत मोठाले डल्ले मारून चोर पसार होतील. पण कसें केले तरी पोलिसचीं माणसें तीं. वाकडें बोलावें तर आताच फरासखान्यात जायची पाळी येणार तेव्हां थोडें नमतें घेऊन मी उत्तर दिलें,

" कांहीं नाहीं हवालदारसाहेब हल्लीं पोरं लवकर उठत नाहींत ना सकाळचीं ? तसंच फुलांचं झालय् बघा शिंचीं उमलतच नाहीत वेळेवर त्यामुळें रमाबाईची पूजा राहाते खोळबून. तेव्हां म्हटल गजर लावून पाहावा काय होतं तें...हॅं...हॅं... काय ? ठेवा तें घड्याळ थॅंक्स बरं काय, येतां ?"

त्याला बळेंच निरोप दिल्यावर दरवाजा लावून घेतला आणि माडीवर जाऊन पुन्हा आंथरुणावर आंग टाकलें.

आठाच्या ठोक्याला पुन्हा कोणीतरी दार ठोठावल आतां मात्र माझ्या तोंडून कृष्णराव मराठ्यांना ऐकवणार नाहींत असे अपशब्द नकळत बाहेर पडू लागले. " कोण लेकाचा गाढव हा ?" असें ओरडतच मी जिना उतरून खालीं गेलों आणि दार उघडलें. पाहातों तों राणू शिंदे !

" माफ करा साहेब. " तो माझा अवतार पाहून म्हणाला, " सायबाला निरूप सांगितला. पर त्यो म्हनतो लिहूनशानी आन डायरीवर. "

" मसणांत गेला तुझा साहेब. "

" किती छान व्हईल तुमची वाचा खरी ठरली तर ! कसा वनवास झालाय् हल्लीं त्या मारडोक सायबाचा. इसवास म्हून कुनावर न्हाईच..."

" बरं, पाहू तुझी डायरी ! " राणूचे मर्दाक पुराण बद करण्याकरतां मी म्हणालों.




त्यानें डायरी पुढें केली. योग्य ठिकाणीं नोंद करून मीं ती त्याच्या हातांत कोंबली आणि दरवाजा धाडकन् लावून घेतला मला वाटलें त्या वैतागलेल्या स्थितीत मीं राणूच्या देखत चार वेळा तरी केस उपटले असतील. कपाळावर हातही मारून घेतला असेल !

साडे आठाला रस्त्यावरून मोठमोठ्यान " बापूराव, अहो बापूराव ! अरे बाप्या ! " अशा हाका आणि टाळ्या. इतक्या मोठ्यानें कीं गडबडून उठावेच लागले मला पाघरूण तसेच आगाभोंवती लपेटून मी गॅलरींत गेलों रस्त्यावर नाना पिंपुटकर उभा होता एक तगडी स्वारीनें सायकलच्या सीटवरच टाकून ठेवली होती

" काय रे बापू, झोपलाच आहेस का अजून ? " गॅलरीच्या कठड्यावर आमचा मुखचन्द्रमा दिसू लागताच त्यानें बेमुर्वतखोरपणाणें विचारलें.

" सरळ ऑफिसात जाववतच नाहीं का रे तुम्हां लोकाना ? केवढ्यानें शख करतो आहेस मघापासून ? "

मीं नानाला पहिल्यानें अक्कलकाढ्याचा एक जबरदस्त डोस दिला

" अरे बाबा सॉरी ! " तो वरमून म्हणाला, " तुझ्या दारावर ही नवीनच नोटीस पाह्यली तेव्हां म्हटल चौकशी करावी कां ? आजारी बिजारी आहेस कीं काय ? "

" म्हणजे ? मी आजारी दिसत नाहीं कीं काय ? "

" छट् दाढी बिढी केल्यावर मला नाही वाटत कुणी म्हणेल तुला काही होतय् असं ! "

" माझ डोक चढलय् रे कालपासून ! " मी बोट उभे धरून वाटोळें फिरवीत म्हणालों, " एकसारख्या चकरा नि उलट्या ! "

" पित्त वाढलेल दिसत. मोरावळा देतों पाठवून ! "

नानाचें ते एकच पेटंट औषध बहात्तर रोग होवोत नाना त्यावर मोरावळा घ्यायला सागायचा. तेव्हां ती ब्याद टाळण्याकरतां मीं थाप ठोकली, " न—नको. आतांच मीं पेलाभर लिंबाच सरबत घेतलय् आता जरा झोप लागली कीं ऑल्

राईट ऑफिसांत किनई हल्लीं डोकं फार कलकलत ! "

" असं असं. कुणीं उठवू नये म्हणून नोटीस लावलीस होय ही ? "

" फार उशीरा डोक्यांत आल तुझ्या नाना ! " मीं कपाळ हातावर पेलून नाटक केल, " आहाहाहा, गळतयू जस. "

" अच्छा मी जातों तू पडून राहा अमळ निवांतपणी वाचू बिचू नकोस हो वरीक ....." असा उपदेश करीत त्यानें सायकलवर टाग मारली मीं पुन्हा आथरुणावर आग टाकल आणि डोळे मिटून शेळ्यामेंढ्या मोजू लागलों.

दहाच्या सुमारास दाराची कडी वाजू लागली अगदीं पैजणाच्या आवाजासारखी मजुळ वाजत होती ती पण मी त्याचें कौतुक करण्याच्या मनस्थितींत नव्हतों मुठी आवळीत केस उपटीत मी मुद्दामच जिन्याच्या पायऱ्यावर दाणदाण आवाज करीत खालीं गेलो. तोडाने तर शिव्याचा सपाटा चाललाच होता दार उघडून पाहिल्यावर मात्र तो एकदम बद पडला ! कारण दामल्याच्या चपूताई दारात उभ्या होत्या. त्यांनीं पदराखाली काहीं तरी झाकून आणलेले होते



" तुझ्या दारावर ही नवीनच नोटीस पाहली तेव्हां म्हटलं चौकशी करावी.

" सुंठीचा चहा आणलाय् मीं थोडासा बापू एव्हढा घ्या कढत कढत नि अमळ पडा म्हणजे बरं वाटेल..."

" प–प–पण मला कांही होत नाही "

" इश्श भारीच भिडस्त बाई तुम्ही मघां पिंपुटकराच्या नानाला सागितलत तें सगळ ऐकलयू आम्हीं इकडनच सांगा-यच झालं, सुठीचा काढा करून द्यायला ! "

" काय म्हणाव गोपाळरावांना आतां ? एवढी कशाला तसदी घेतलीत तुम्हीं माझ्याकरतां ? डोक थोड चढलयू घटकाभर

डोळा लागला कीं वाटेल बरं ! ”

“ छे छे, अशी आबाळ नाहीं हो कामाची ! आम्ही कुणी परके का आहोंत ? शेजारीं राहून आम्हाला कसे हें पाहावेल ? ह, घ्या हा चहा. इन्दुताई घरी असत्या तर नसतों काही आलों आग्रह करायला. हो मग होतच तुमच हक्काच माणूस ! ”

“ पण चपूताई .”

“ पण बीण काही नाही घेऊन टाका पाहू चटकन् कीं आणू बोलावून इकडच्या स्वारीला ? ”

“ न–न–नको चपूताई. ठेवा तो चूळ भरून घेईन मी ”

पण त्या तशा थोड्याच हलतात ? चूळ भरून खरोखरीच तो तोंड पोळेसा तिखटजाळ सुठीचा चहा घशाखालीं कसातरी ढकलला तेव्हा माझी सुटका झाली जातां जातां त्यांनी पुन्हा बजावलेंच, “ डोक्याला गुडाळा कांही तरी नि वाऱ्यावर नका बसू पांघरूण घेऊन स्वस्थ पडा म्हणजे घाम येईल नि मोकळ वाटेल गांवांत नाहीं तरी हल्ली आहेच तापाची साथ ! ”

मनातल्या मनांत चपूताईवर खूप जळफळत मी एकदाचा पुन्हा माझ्या कॉटवर जाऊन पडलों आतां दार वाजलें तरी ऐकायला येऊ नये म्हणून मी तोंडावरून पांघरूण घेतलें.

अर्ध्या तासानें कुणी तरी कडी वाजवीत असून दारावर मोठमोठ्याने धक्केही देत आहे असा मला भास झाला बहुतकरून दोन माणसें एकदम आली असावीत. कारण एखाद्या नाचाला साथ करावी तशी एकजण तबल्याच्या ठेक्यावर धक्के मारी आणि दुसरा कडीचा आवाज घुगुरासारखा करी साखळीच्या कड्या दाराना लावायच्या नाहींत, असा कोणीं नियम केला तर...

निजून राहाण्याची सोयच नव्हती. कारण त्या तालबद्ध आवाजामुळें रस्त्यावर लोक जमायला लागले. तेव्हां डोक्याला उपरणें गुडाळून खालीं गेलों आणि दार उघडलें. गोठ्यांचा गणू आणि प्रोफेसर पिरपिऱ्यांचा नोकर पांडू अशी जोडगोळी दारांत उभी होती.

“ मामीनें ही मुळी दिलीय् दुधांत उगाळून लावायला नि त्यांतलच थोड प्यायला पण सांगितलय्. ” गणूनें माझ्या हातीं लाकडाची एक विटी देत म्हटलें.

“ वाहवा छान्. आंतून बाहेरून काम करणारी दिसते ही वळी ” मी ती लांब, भिरकावून देत उपरोधिकपणानें म्हणालों, “ मामींना म्हणाव मला कांहीं झालेलं नाहीं.

झोपू द्या मला निवांतपणीं म्हणजे उपकार होतील हें बघ, झालय् का मला कांहीं ? ”

त्याची खात्री करण्यासाठीं मी चार बैठका काढून दाखवल्या. तो हसला आणि पलीकडच्या पायरीवर पडलेली आपली मुळी हस्तगत करण्यासाठी धावला. तसा पांडू पुढें आला आणि त्यानें माझ्या हातांत चिठ्ठी दिली चिठ्ठी प्रोफेसरसाहेबांनींच लिहिलेली दिसली. पांडू दोन बोटे तोंडात घालून उभा राहिलेला पाहून मी ओरडलों, “ ठीक. चिठ्ठी मिळाली तू जा घरीं ”

“ जबाब घेऊन याया सांगितलान् साहेबानें. ”

“ बापूराव ह्यांस—

आपल्या समाचाराकरतां मी व सौ सध्याकाळी चार वाजता येत आहोंत. चालेल ना ?

तुमचा

पिरपिरे.”

एवढा मजकूर चिठ्ठींत होता मी उलट जबाब लिहिला,

“ गालगुड झाल्याचा सशय येतो काखेंतही.कसलीशी गांठ आहे तेव्हां उगीच ह्या डेंजर झोनमध्ये कां येतां ?—आपला बापू ”

दुपारी दोन वाजता पुन्हा दारावर धक्के ! आता मात्र मी बेभान झालों. कॉटवर पडल्या पडल्याच ओरडू लागलों, “ फुटो हें मस्तक तुटो हें शरीर—कोणालाही दार, उघडी ना ! ”

बाहेर माझा निर्धार ऐकू गेला कीं नाहीं कोण जाणे पण धक्क्याच्या जोडीला दारावरची कडी खडखडा वाजायला लागली आगीच्या बबावरील घटेसारखी वाटली ती मला कडी वाजवूनही ती व्यक्ति थाबली नाहीं इग्रजी मड्डमसारखे हेल काढून, पऽऽऽपा, पपा, यूऽऽऽहूऽऽ डॅऽऽडी यूऽऽऽहू ! अशा पिंपाणीच्या आवाजात हाकाही मारू लगली आरडत ओरडत मला उठावें लागलें.

सज्जात जाऊन हळूच खालीं वाकून पाहातों तों दारासमोर टागा ! टांग्यांत सामान आणि सौ ! आणि पायरीवर कडी वाजवीत बेबी उभी ! आं ? मी स्वप्नात तर नाहीं ? कीं खरोखरीच मला वातबीत झालाय् ? कुठें सौभाग्यवती, कुठें मी ! साठ मैलावर आपल्या भाचीच्या लग्नात वास्तविक गर्क असणार ती कालच्याच मुहूर्तावर लग्न. म्हणजे आज वरात आणि सगळे सोहाळे डोळे भरून पाहिल्याशिवाय कां सौ. हलणार ? मग आज येथें कशी ही ? हें आहे तरी काय इन्द्रजाल ?

इतक्यात बेबीचें माझ्याकडे लक्ष गेलेंच आणि आपल्या हातांतली ती टीचभर



छत्री उंच करून ती ओरडली,

"यूSSSहू पपा! आम्हीं आSSSलों!"

"फार चांगल केलत. याSSS ब्यल!" मी तिला वेडावीत उत्तर दिलें आणि खालीं जाऊन दार उघडलें. हें स्वप्न नसून वस्तुस्थिति आहे ह्याविषयी मला आतां शंका उरली नव्हती.

माझा अवतार आणि सज्जांतून मीं केलेले हातवारे पाहिल्यावर सौ इन्दूचा चेहेरा चिंताक्रांत झाला. कांही वेळ ती माझ्याकडे बारकाईनें पाहात उभी राहिली आणि मी जेव्हां खेकसलों, "आदळलात एकदाच्या इथे येऊन?" तेव्हां तिच्या डोळ्यांना चटकन् पाणी आलें.

"एक दिवस माणसाला निवातपणा मिळू द्यायच्या नाहींत तुम्ही चागला सूड उगवलात माझा ह्यापेक्षां जगलांत पळून गेलेल बरं..." माझी गर्जना चालूच होती

दारावरची नोटीस तिनें फाडून टाकली केरसुणीनें केर काढला नळावरून स्वच्छ पाणी आणलें आणि सकाळच दूध पातेल्यांत ओतून स्टोवर ठेवले.

"आपल्याला किनई फार त्रास झालेला दिसतो कामाचा ब्लडप्रेशर असाव" ती माझ्याकडे चमत्कारिक तऱ्हेनें पाहून आपल्या मृदु आवजान बोलू लागली, "आपण वर जाऊन अमळ स्वस्थ पडाव म्हणजे हुषारी येईल माझ ऐकायच गडे..."

हा उपदेश करणारीं माणसें आज मला भेटणार आहेत तरी किती? आणि तो उपदेश मला अमलांत आणूं न देण्याचा विडा त्यांनीच उचलला नव्हता काय? तोंड दाबून बुक्क्यांचा मार कसा असेल ह्याची मला चांगलीच कल्पना आली त्या दिवशीं! फाजील माणुसकी असलेल्या ह्या माणसांनीं कालपासून माझी पाठ घटकाभर आंथरुणाला टेकू दिली असेल तर शपथ. सर्वांवर ताण म्हणजे माहेराहून एकाएकीं उपस्थित झालेली सौभाग्यवती आणि तिच्याकडूनही तोच उपदेश!

पण माणूस हा परिस्थितीचा गुलाम म्हणतात तें कांहीं खोटें नाहीं. सौ. च्या गालावरून ओघळणारे अश्रु पाहून मी विरघळलों! सगळा राग विसरून मीं तिला कालपासून घडलेली खरी हकिगत सांगितली. डॉक्टरचें नांव ऐकल्याबरोबर ती थोडीशी घाबरली. पण त्यानें केलेलें माझ्या प्रकृतीचें निदान कळल्यावर तिचा जीव खालीं पडला आणि ती एकदम म्हणाली,

"हात्तिच्या, एवढच ना? मीं म्हटल एवढी तार केली तेव्हां..."

"तार केली? कुणीं तार केली?" मी आश्चर्यानें विचारलें. कारण ह्या भानगडीचा मला कांहींच सुगावा नव्हता.



" आदळलांत एकदाच्या इथें येऊन ! "

"म्हणजे? रघूला आपणच सांगितली ना तार करायला?"

"छे! हा त्या गाढवानें सगळा परस्पर कारभार केलेला दिसतो."

"अगबाई, मेल्यानें माझी वरात बुडवलीन्!"

"तुझी वरात केव्हांच निघाली होती माझ्याबरोबर." मी हसत म्हणालों.

"इश्श! माणकीची वरात म्हणतेंय् मी आजच निघायची होती. किती थाटांत वरात काढणार होतीं तिचीं सासरची माणसं पन्नास रुपयांचीं तर नुसतीं फुलं भरायचींत मोटरीला पण आमच नशीबच फुटक. तुमची तार येऊन धडकली ना साडेसाताला!"

"माझी नाहीं. रघू वैशपायनाची"

"अहो, पण तार पाह्यली म्हणजे कोण घाबरून जात माणूस! भरल्या लगीनघरांत केवढा गोंधळ!"

"अस लिहिल तरी काय होत त्यानें तारेंत?" माझी उत्सुकता वाढल्यामुळें मीं प्रश्न केला

"इश्श...मी नाहीं सांगत"

सौ. मुरका मारून चटकन् म्हणाली

इतक्यात रघूच दारावरून जाताना दिसला. त्याबरोबर मोठ्यानें त्याला हाक मारून मी म्हणालों,

"या रघुराज, चागला उपद्याप केलात हा. लोकाच्या घरच्या उठाठेवी करण्याची खोडच दिसते तुम्हाला जन्माची!"

"काय म्हणाल तें ऐकून घेतल पाहिजे बापूराव! अहो, आमचा शेजारधर्म आम्हांला थोडाच स्वस्थ बसू देणार? एका आळीत राहायच नि शेजाऱ्याची अडचण निवारायची नाहीं, अस आमच्यानें होण नाही"

"अरे पण मला विचारायचस तरी. मी काहीं मेलों नव्हतों"

"आतां तुम्हीच पाहा वहिनी, काल मी हपिसांतून आलों तेव्हां ह्याच दार बद. दारावर ती चमत्कारिक नोटीस राणू शिंदे विजेच कनेक्शन दुरुस्त करायला येतो तर हे थाप देतात, उद्या घरांत नाही कुणी हाका मारायला लागल कीं वात झाल्यासारख आंगावर धावून जायच आजच बघा त्या पिरपिऱ्याना काय लिहिल कुणास ठाऊक? त्यानी आपला गावाबाहेर राहायला जायचाच हेका धरलाय् गालगुडाची सांथ आलीय् म्हणे गावात. असे प्रकार पाह्यल्यावर आम्ही काय समजायच? आपल्या शास्त्रीबुवांना वेड लागण्यापूर्वी असच काहीं तरी झाल होत तेव्हां म्हटल वेळीच तुम्हाला बोलावून घ्याव हें बरं..."

"पुरे रे तुझी विचक्षणा. ती ऐकूनच डोक फिरायच एखाद्याचं. बरं आता

आलाच आहेस तो चहा घेऊन जा इकडे किनई अलीकडे हपिसचं कामच फार असतं. रात्रदिवस त्या फायली घेऊन बसायच असतं. .डोक्यावर ताण पडतो एकसारखा " सौ नें मला सभाळून घेतलें त्याच्या एकदर बोलण्यावरून त्या तारेंत रघूजींनीं कोणते तारे तोडले असले पाहिजेत ह्याची मला चागली कल्पना आली. पण त्या बाबतीत मला आता वेडच पाघरावें लागलें!

" भारीच कामाचा हव्यास तुम्हाला बापूराव. अशा कामाच्या ओझ्याखालीं दुसरा एखादा छाती फुटून मेला असता असल कसल काम हे? ह्या कामापायीं आमच्या चिंतोपतांना ब्लड्प्रेशरची व्यथा जडली माझ ऐका बापूराव सरळ आठ दिवस रजा घ्या नि आठी दिवस निवातपणें लोळून काढा " रघूनें जातां जातां मला उपदेशाचा एक डोस पाजलाच

आता आलें क लक्षांत तुमच्या, मी ती कॉलनीची स्टाइलच बरी, असें का म्हणालों तें?






कुत्रा, कबुतर, माजर, मोर, पोपट इत्यादि प्राणी घरात पाळावे असा मला लहानपणापासून विलक्षण नाद पण आमच्या घराची वास्तु अशी द्वाड होती, कीं ती आमच्या घरांत कोणत्याही प्राण्याचा विशेष पाय ठरू देत नसे त्यामुळें आत्याने एक दिवस आपला निर्णय देऊन टाकलान्, "बग्या, हे प्राणी आपल्याला धार्जिणे नाहींत उगीच त्या फंदात पडू नको "

"धार्जिणे नाहींत म्हणजे काय आत्या ?" मीं विचारलें, "आपण नाहीं का" धार्जिणे एकमेकांना ?"

"उगीच वात्रटपणा करू नकोस "

"नाही, पण आत्या, एक चिमणा पोपट तरी आपण ठेवूयाच !"

"कांही नको आपली हौस नि त्याचा काळ "

आत्यानें एकदा आपला निकाल दिला म्हणजे त्यावर अपील नसे. माणसें नसतात का परधार्जिणीं ? मग ह्या पोपटानाच कोठून आला एवढा भिडस्तपणा ? असा विचार करीत वाईट तोंड करून मी रस्त्याकडे पाहात उभा होतों, इतक्यात दरवाजा उघडून माझा शाळासोबती विद्याधर पडित आंत आला. आणि काय आश्चर्य ? त्याच्या हातांत राघूचा एक सुदर पितळी पिंजरा हेलकावे खात होता. तो चकचकीत पिंजरा आणि त्यांतल्या डोलकाठीवर "झोका घेऊ या" गाणें करणारा हिरवागार पोपट पाहून माझी विषण्णता कोठच्या कोठे पळाली आणि मन त्या पिंजऱ्याबरोबर हेलावू लागलें.

आमचा विद्याधर म्हणजे महा शिष्ट. त्याच्या चोंचकुळ्या हनुवटीमुळें आम्हीं त्याला मॅटेग्यूच म्हणत असू. मीं तर त्याला हसतांना केव्हांच पाहिला नाहीं. इतका गंभीर

चेहेरा असायचा सदोदित कीं जसें काहीं ह्याला हिशोब कळून चुकला आहे कीं उद्यां जगाचा प्रलय होणार! असल्या ह्या शिष्ट दादाभाईच्या हातांत पोपटाचा पिंजरा असणें म्हणजे एक आश्चर्यच होतें

त्याला बसायला खुर्ची दिल्यावर मी विचारलें,

" हल्लो! विद्याधर, ओ. के ?"

तोंडावर एकही हास्यरेषा उमटू न देता तो म्हणाला,

" येस्स!"

" काय हुकूम ?"

" एवढा माझा पोपट सभाळशील का चार दिवस ?"

" का रे बुवा ?" मनांतून उल्हसून पण वरकरणीं आश्चर्य प्रगट करीत मीं विचारलें.

" मला गांवाला जायच आहे चार दिवस. नि घरीं कुणी नाहीं." त्यानें मोजके शब्द उच्चारले

" अस्सं!"

" मग काय ? आहेस का तयार त्याला संभाळायला ?"

" ओ यस्. व्हाय् नॉट् ?" मीं ठासून म्हटले आणि नेहमीच्या शिरस्त्याप्रमाणें विचारलें,

" चहा सागू का थोडा ?"

" छे छे! मी आताच घेऊन आलोंय् "

" नांव काय पोपटाच ह्या ?" ह्याच्यापेक्षां कदाचित् पोपटच जास्त बोलेल अशा समजुतीनें मी पोपटाचा परिचय करून घेण्याच्या कामाला लागलों

" सोन्या "

" काय सोन्या ?" मी आश्चर्यानें विचारलें

" हो कां ? एवढ नवल कसल त्यात ?"

" नाहीं आपल उगीच! हा, विठूमिया, बोलो, गगाराम बोलो!" मी पोपटाच्यापुढें टिचक्या वाजवीत त्याची ओळख करून घेण्याचा प्रयत्न करूं लागलों. तें पाहून विद्याधर म्हणाला,

" बघ्या, तो इतकसं बोलत नाहीं. उगीच थोड बोलतो. नि तें देखील ठरलेल्या वेळीं!"

" अः! त्याची नको काळजी. तुझ्या सहवासामुळें पोपट असा घुमा राहिलाय्.

माझ्याकडे पाहाशील आतां कशी व्याख्यान द्यायला लागेल तो!"

"पाहा शिकवून जमलं तर तुझ्या ताब्यांतच राहाणार आहे तो चार दिवस. मात्र संभाळ ह त्याला चांगला. नाहीं तर करशील आबाळ त्याच्या पथ्यपाण्या-ी "

"पथ्यपाणी ?"

"म्हणजे अस, की त्याच खाणपिण मी डाक्टरी सल्ल्याप्रमाणें ठरवून टाकल आहे रात्रीं साताला त्याला अधारात टांगायचा. पिंजऱ्याभोवती शाल टाकायची. खालीं लहानशी शेगडी ठेवून द्यायची सकाळीं साताच्या ठोक्याला शाल काढून त्याला तुरटीच्या गुळण्या करायला द्यायच्या नि मागाहून मोजून दोन ड्राम चहा! अकरा वाजतां चौदा ग्रेन टोमॅटो, एक ग्रेन फ्रूट सॉल्ट नि एक वाजता थायमोलीनचा बाथ पुढें कॉडलिव्हर आइलचे चमचे "

"बाप रे!" मी छाती दडपून गेल्यामुळें उद्‍गारलों," अरे ऐशींच्या पुढे गेलेला आमच्या गावातला पेन्शनर सुद्धा भर पहाटे टाळक उघड टाकून टेकडीवर टुणटुण उड्या मारीत जातो नि ह्या पक्ष्याला एवढ पथ्यपाणी ?"

"पाहा बुवा. आहे खरं त्याचे असं खुषीनें तयार असलास तर ठेवतों; नाहीं तर पाहू दुसरी व्यवस्था "

"छे छे. इतका कांहीं त्रास नाहीं व्हायचा मला म्हणा! नि मला तरी आहे काय उद्योग हल्लीं ? राहू दे त्याला सारी व्यवस्था चोख होईल. वेळापत्रकच करून टाकतों एक त्याच्या रोजच्या आहारविहाराच म्हणजे झाल!"

एवढें आश्वासन मिळाल्यावर मात्र विद्याधर जरासा हसला आणि माझे आभार मानून निघून गेला.

तो गेल्यावर सोन्याचा पिंजरा थडीवाऱ्यापासून सुरक्षित अशा कोणत्या ठिकाणी टांगावा ह्याचा विचार करीत मी इकडे तिकडे फिरू लागलों जो आनद उपभोगण्यास मिळावा म्हणून आज इतके दिवस मनानें हाय घेतली होती, तो चार दिवसापुरताच का होईना पण एकदाचा आपल्या वाट्याला आला ह्या विचारानें माझ्या नशिबाची मला धन्य वाटली. फिरता फिरतां मी स्वतःशीं गुणगुणूं लागलों,

"श्यामाच म्हणू काय तुला श्यामल पोरी ?
रंभापरि रंभाच जशी तू हिमगौरी !..."

पहिलें कडवें संपलें मात्र. तोंच पिंजऱ्यांतला पोपट फडफडू लागला आणि मोठ्यानें म्हणाला, "च् च् विठ्ठूमियां, काय करतो रे ?"

ताबडतोब मीं जीभ चावली आणि दचकून पोपटाकडे पाहू लागलों. आतां सोन्या पुन्हा एखाद्या यतीसारखा डोळे मिटून आपल्या दाडीवर बसला होता. मीं त्याला बोलावयास लावण्याचा पुष्कळ प्रयत्न केला परंतु त्यानें आपलें मौन सोडलें नाहीं शेवटी माझ्या खोलींत एका उबदार ठिकाणीं मीं त्याचा पिंजरा टांगून ठेवला आज त्याची आणि आपली विशेष ओळख नसल्यामुळें तो भिडस्तपणानें वागत असावा, पण उद्या त्याचें तोंड आपण यथास्थित मोकळें करू अशा हुरूपानें मी त्यानतर त्याला विशेष त्रास दिला नाही

संध्याकाळीं माझे कांही मित्र चकाट्या पिटायला आले. किर्लोस्कर मासिकाचा ताजा अंक आणि त्यातील बुवा आणि त्यांच्या शिष्यिणी ह्यांच्या अद्भुत गोष्टी, ह्याच आमच्या चर्चेचा विषय होता त्यांतल्या त्यात आमच्याच गावातील अभिजात लेखिका श्यामा बाम ही देखील कोणच्याशा महाराजाची शिष्या आहे अशी लोणकढी आमच्यापैकीं एकानें ठेवून दिल्यामुळें ह्या चर्चेला असा कांहीं रंग आला होता कीं कांहीं विचारू नका. किर्लोस्करातील सती गोदावरीचा फोटो आमच्या पुढें करीत बब्रू म्हणाला,

" अरे बग्या, हा फोटो पाह्यलास का ? कुणासारखा आहे तो ? "

" आं ! अरे ही तर थेट आपली श्यामा " बाळू गरजला.

"पाहू पाहू ! " मीं तें चित्र न्याहाळीत म्हटलें, "खरंच, फार साम्य आहे बुवा ! का श्यामनेंच दिलाय् आपला फोटो अशा वेषांत कुणास ठाऊक ? अहाहा ! काय रुबाब ? काय ग्रेस ? काय ब्यूटी ? " मी बेहोष होऊन त्या चित्राचें चुबन घेऊ लागलों तोंच मघाची फडफड आणि तिच्यामागून गभीर आवाज आला,

"चू चू विठूमिया, काय करतो रे ? " माझ्या हातून अक गळून पडला आणि ती सारी मडळी फिदीफिदी हसू लागली

"अरे, काय रे हें बग्या ? " बाळू हसत हसत म्हणाला, "पोपट आहे, कीं आहिताग्नि आहे एखादा ? लेकाची ऐट तर पाहा ! "

सर्वांनीं पिंजऱ्याकडे पाहिलें आणि ते पोटभर खिदळले मी ओशाळलों आणि त्याच्यावर कांहीं तरी फेकून मारण्यासाठीं जवळपास कांहीं पाहूं लागलों पण लगेच माझ्या लक्षांत आलें कीं पोपट आपला नाहीं. विद्याधरचा आहे.

"काय रे बग्या ? हा पोपटलाल एवढच बोलतो कीं काय ? असला हा धर्मोपदेशक तुझ्यासारख्याच्या घरांत काय कामाचा ? छट्. आमच्या अण्णांच्याकडे

एक पोपट आहे तो तर, 'झोक तोल तोल तोल ग, आडाच पाणी लई खोल!' ही रेकॉर्ड पहिल्यापासून शेवटपर्यंत घडाघड म्हणतो. आणि गळा पण असा मिठ्ठास आहे कीं कर्नाटकी गोहर जशी!"

"सगळ खरं." मी म्हणालों, "पण हा प्राणी असा आहे त्याला काय करणार?"

"हाकलून दे त्याला! नाही तर मुंडी मुरगळून मोक्ष देऊन टाक. त्यात काय कठीण आहे?"

"पण मित्रांनों, तो पक्षी माझा नाही."

"मग कुणाचा आहे?"

"विद्याधर पंडिताचा आहे."

"अस्स. तरीच." सगळ्यांनी एकदम उद्गार काढले.

"नाव काय त्याच?" बाळूनें पृच्छा केली.

"सोन्या"

"काय? सोन्या?" सगळ्यानी विचारलें.

"हो. सोन्या."

"हीः ही ही! मग सोन्याचा कळसच आहे म्हणायचा." बाळू खिदळला. आम्हीही हसू लागलों परंतु पोपटाला ते सहन झालें नाहीं. तो फडफडून गरजला,

"चू चू विठूमिया, काय करतो रे? काय करतो रे?"

बाळू गप्प झाला सगळे एकमेकाच्या तोंडाकडे पाहू लागले. बाळू सुस्कारा टाकून म्हणाला, "बरोबर आहे."

"काय बरोबर आहे?" आम्ही विचारलें

"अश्लील बोललों मी!"

"आणखी?"

"पावित्र्यविडंबन झाल!"

"अ!" बंडू फुस्कारला. "त्यात रे काय अश्लील आहे? थांब, मीच हासडतो चार शिव्या ह्या लेकाला झकासपैकी!" असें म्हणून बंडूनें खरोखरीच ओंगळ शिव्या द्यायला सुरुवात केली. परतु आश्चर्य असें, कीं पोपटानें मानदेखील वर केली नाहीं. शेवटीं बाळू कटाळून म्हणाला, "चला रे गड्यांनो, काय त्या पक्ष्याच्या नादीं लागण्यांत अर्थ आहे? त्याला सोन्याचा कळस म्हटल्यबारोबर अश्लील वाटलं, नि निवडक शिव्या मोजल्या त्या खपताहेत. पक्का पुंड आहे हा!" त्यानें असें

म्हटल्याबरोबर सगळे उठून चालते झाले

हताश होऊन मी पिंजऱ्याजवळ गेलों एक हिरकुटाची काडी घेऊन पोपटाला चांगलें जागें केलें आणि त्याला नाना तऱ्हेचे शब्द व वाक्ये बोलायला शिकवू लागलों इंग्रजी, मराठी, हिंदुस्थानी पदाच्या ओळी, इतर गोड गोड शब्द, चांगलीं नांवे, वगैरे अनेक प्रकार त्या पिंजऱ्यापुढे बडबडत मी तब्बल दोन तास उभा होतों पण तो प्राणी महा खमग ! त्यानें एकदाही आपली चोच उघडली नाहीं कीं पख फडफडवले नाहींत शेवटीं मॉरिस शेवालियेचे "व्हॉट् वुड् यू डू ?" हें पेटट गाणें मी मोठ्या खुमासदारीनें साभिनय टिचक्या वाजवीत म्हणूं लागलों, तेव्हां स्वारीनें एकदा पख झाडले आणि तोंडातून ठराविक शब्द काढले,

"चू चू ! विठूमिया, काय करतो रे ?"

आता मात्र मी बेभान झालों आणि विद्याधरला एक पत्र खरडावयास बसलों.

अर्धे पत्र लिहून झाल्यावर माझ्या ध्यानात आलें, कीं विद्याधरचा पत्ता आपल्याला ठाऊक नाही आणि कोणत्या गावीं तू जातोस असे त्याला विचारण्याचेही आपल्या ध्यानात आले नाहीं. पत्राचा बोळा केला आणि तो खिडकीबाहेर फेकून देऊन मी तडक घराच्या बाहेर पडलों व नव्या पुलाच्या रस्त्याला लागलों. त्या नतद्रष्ट पोपटाचें आता करावें तरी काय, हा एकच विचार मनाला त्रासून सोडीत होता !

अशा स्थितीत गावाच्या बाहेर पडून रेल्वेजवळच्या पुलावरून मी खालीं मान घालून हळूहळू चाललों असता एकाएकी माझ्या कानावर विलक्षण किलबिल पडली ! मान वर करून पाहातों तों एक अद्भुत देखावा ! एक मोठी थोरली लॉरी रस्त्यानें आस्ते आस्ते मुगीच्या पावलानी समोरून येत होती, आणि त्या लॉरीच्या दोन्ही बाजूना व मागच्या आगाला रंगीबेरंगीं पातळें नेसलेल्या अनेक तरुणी आपल्या नाजूक हातांनीं त्या लॉरीची गती वाढविण्याची पराकाष्ठा करीत होत्या चाक वेडेंवाकडें फिरवीत आणि मध्येंच किल्ल्या दाबीत व उघडीत बसलेला मिस्किल ड्रायव्हर उसना गभीरपणा चेहेऱ्यावर धारण करून गाडी ढकलणाऱ्यांना धीर देत होता,

"जरा हिकडून न्यट लावा, बाई अग आस्सं. हा ! आत्तां पडल पगा स्पार्क विंजनांत ! तिच्याइची कदी बी न्हाई अडत अशी ! आन् आज काय जालया बयाला कुनाला ठावं ? ह्ये त्या पीरजाद्याच पिटरोल. घासलेट वतीतो लेकाचा. समदा

कचरा!" ते ऐकून त्या तरुणीच्या ताड्याकडून "उ! आः! हुम्! स्शु!" "मेलें ग बाई वैजू!", "अग वेणे, पाय काय देतेस खुशाल माझ्या पातळावर?", "चांगली मोटर निसटली बरं बनुताई" "म्हणे डेमॉन्स्ट्रेशन्! कसच कपाळाच हे डेमॉन्स्ट्रेशन?" असे कांही तरी उद्गार बाहेर पडले

असा देखावा पाहिल्यावर माझ्यासारख्याचे पाऊल का जागचे हालणार आहे? "मदत हवी असल्यास ती देणें आहे" अशी जाहिरातच जणू काय तोंडावर रंगवून मी त्या देखाव्याकडे पाहू लागलों. आमची जाहिरात ड्रायव्हरसाहेबाच्या नजरेला पडली आणि खरोखर जिवांत जीव आल्यासारखा एक लाबलचक निःश्वास त्याच्या नाकातून बाहेर पडला! मला सलाम ठोकल्यासारखें कांहीसें करून तो म्हणाला, "याव, साहेब जरा! इथून तिथवर नेऊनशान उताराला लावली मजी झालच पगा काम. पर जरा बिगी बिगी लोटाया होवी, मजी टॉप टाकतों यकदम!"

"कां? एजिन बंद पडल वाटत?" एखाद्या सरावलेल्या मोटारवाल्याप्रमाणें मीं प्रश्न केला.

"हा! ब्यल्कोचा पाइंट चिकटलाय्. एकदा स्पार्क आली मजी निघल इमानावानी! ह! व्हा पगु जरा माग!"

ड्रायव्हरच्या चढेल सूचनेचा जरी मला राग आला, तरी मोटर लोटून लोटून हैराण झालेल्या त्या सुदर तरुणींच्या ताड्याकडे पाहिल्यावर मी तो एकदम गिळून टाकला. तीं सुकलेलीं तोंडें, दहिवर पडलेल्या कमळासारखे, पण कचऱ्यामुळें लाल झालेले डोळे, घामानें निथळणाऱ्या माना व हातपाय, विसकटलेले केस आणि आंब्यावर आंग टाकणाऱ्या वेलीप्रमाणें विगलित होऊन झुकणाऱ्या त्यांच्या बाधेसूद आंगलटी! अहो, अवषर्णानें वाळलेलीं बाजरीचीं ताटे पाहाणें निराळें आणि भर उन्हांत मोटर ढकलण्यामुळें कोमेजून गेलेल्या तरुण स्त्रिया पाहाणें निराळें! मोटरीला मागच्या बाजूनें नेट देऊन मी हुबैला करू लागलों.

परंतु गमत अशी, कीं माझे हात मोटरीला लागतांच अगोदरच थकलेल्या वेली खरोखरीच गळून पडल्या. कोणी पदरानें घाम पुशीत, कोणी आपल्याच तोंडानें हातावर फुकरा मारीत, कोणी केसांवरून हात फिरवीत, हाश्श हुश्श करीत बाजूला झाल्या. एकच काय ती नेट धरून राहिली आणि माझ्याप्रमाणेंच पाठीमागच्या बाजूनें गाडी लोटण्याचा प्रयत्न करू लागली. एवढा टिकाव धरून राहिलेली अशी ही आहे तरी कोण म्हणून मीं चोरट्या नजरेनें एकवार तिच्या चेहेऱ्याचें नीट अवलोकन




मीं चोरट्या नजरेनें एकवार तिच्या चेहऱ्याचें नीट अवलोकन केलें आणि दचकलों.

केलें आणि दचकलों. आं! मघाशी जिच्याबद्दल माझ्या मित्रमंडळींत चर्चा झाली, ती आमच्या गांवांतील लेखनचंद्रिका, श्यामा बाम अशा भलत्या ठिकाणीं? मी दचकून पडण्याच्या बेतांत होतों ते पाहून तिनें विचारलें, "अग बाई, दगड लागला वाटतं तुम्हाला?"

"ऊं·? नाहीं! आपल,... ह ह!" मी अर्धवट तोंडांतल्या तोंडांत काहीं तरी चांचरलों

"मोटरीनें आज चागलीच फजिती आरभलीय् आमची जाताना बद पडली, पण जरा ढकलल्यावर झाली चालू. पण आता? केव्हाची ढकलतों आहोंत तरी मुळ्ळीं चालू होत नाहीं. असल्या कसल्या मेल्या ह्या मोटरी!"

"पेट्रोलमध्ये कचरा आला किनई, म्हणजे असच होत ह्या मोटरींना होईल आतां चालू स्पार्क पडल्याबरोबर. आपण सगळ्या जणी एवढ्या कुठें गेलां होता?"

"कुठें म्हणजे? कौन्सिल हॉल"

"आं? कौन्सिल हॉल? आपल्यासारख्या त्या बाजूला जात नाहींत फारशा!"

"म्हणजे!" भुवया चढवून तिनें प्रश्न केला

"नाहीं काहीं नाहीं आपल उगीच" भुवया चढवल्या म्हणजे काय करावें ते मला पूर्ण अवगत होते.

"आज ते देसाई आपल दुष्ट दत्तक बिल नव्हते का आणणार कौन्सिलात?"

"हं ह! आयू स्सी!" जसे काही आपण त्या गावचेच नाहीं अशा नेणतेपणानें मी उद्गारलों.

"चागली जिरली त्यांची नाक मुठींत धरून बिल माग घेतलं. पहिल्याने म्हणाले आम्ही बायका; बडबडीपेक्षा तें आणखी काय करणार? पण जेव्हां का दाखवल पाणी, तेव्हा समजल बायका म्हणजे काय आहे तें!"

"मी तेंच म्हणतों" आता एकदर धोरण ठरवून मी गभीर आवाज काढून म्हणालों, "आपल्या स्त्रियाविषयी ह्या लोकांच्या काहीं विपरीत च कल्पना असतात. आपल्या समाजात स्त्री आणि स्त्रियाची चळवळ ह्या केवढाल्या शक्ति आहेत ह्याची त्यांना दाद नसते. बिल आणताहेत म्हणे! उगीच समाजाला बिळ पाडायचा उपद्याप! बायकाच्या बिलाच्या ह्यांना उठाठेवी सागितल्या कोणीं!"

"जेव्हां का पाह्यली त्यांनीं आमची पलटणची पलटण, तेव्हां असा गांगरला म्हणतां? त्या रावबहादुर मिशाळांची तर दांतखीळ वाजायला लागली. कोपरान्

कोपरा आमच्या स्वयसेविकानीं रोखून धरलेला होता पुन्हा कांहीं साऱ्या दिवसांत तोंड दाखवल नाही त्या बिलबहाद्दरानें ! " असें म्हणून श्यामा मोठ्यांदा हसली. चांदीची घटा वाजवावी, त्याप्रमाणें तिच्या मधुर हास्याच्या लहरी चहूकडे निनादित झाल्या.

मी तिच्या ह्या हसण्यानेंच भान विसरलों आणि चटकन् म्हणालों, " बाकी देसाई खरा हुषार माणूस दत्तक बिलाची टूम त्याने काढली नसती, तर आजचा हा अनुपम सोहळा कौन्सिलला तरी केव्हा पाह्यला मिळाला असता ? अगदीं फूटलाईट परेडमधल्या पॅरिस ब्यूटीसारखा दिसला असेल तुमचा तांडा ! अहाहा ! "

" शट् अप् मिस्टर " तिनें चमकावलें

" ओ ! आय् ॲम् सॉरी " मी शुद्धीवर येऊन माफी मागितली

" बेछूट सौंदर्योपासक दिसता तुम्हीं "

" छे छे तस नाही " मी ओशाळून म्हटलें, " आहे आपला थोडासा नाद झाल."

" तसा काहीं वाईट नाही हा नाद , पण बेतात ठेवा थोडी सौंदर्यदृष्टि हवीच नाही तरी माणसाला पण..."

" आं ! काय तुम्हालादेखील असं वाटत ना ? " मी अधीर होऊन आनदानें म्हणालों.

तिनें हसल्यासारखें केलें माझें हृदय आतल्या आत उलटेपालटे होऊ लागलें. आकाश खालीं येऊ लागले आणि तितक्यात इजिनात स्पार्क पडल्यामुळें मोटर फुर्रर्र आवाज करून हलू लागली

ह्यानतर वेळ इतका कांहीं भराभर जाऊ लागला कीं बोलता सोय नाहीं ! तिनें मला तिच्या किती तरी आवडीनिवडी सागितल्या मीही पण अवडक चवडक बाता मारण्यास कमी केलें नाहीं लेखनक्षेत्रात तिनें केलेला अद्भुत विक्रम मीं नेपोलियननें केलेल्या पराक्रमाच्या वरच्या कोटीत नेऊन बसवला तिची एकेक गोष्ट म्हणजे आमच्या राष्ट्राच्या भावी इतिहासातले एकेक जिवत पानच आहे असें तिला बेलाशक सांगून टाकलें ! पाण्याच्या शिपकाऱ्यानें जशीं गुलछबूचीं फुलें तर्र व्हावीं, तशी ती फुलली इतक्या वर्षानी आज आपल्याला खरा रसिक भेटल्याचें तिनेंही प्रांजळपणें कबूल केलें चद्राला पाहून सागराला जशी भरती यावी तसें तिच्या हृत्सागरला खरोखरीच आनदाचें भरतें आलें होतें. आपण वाङ्मयांत कोठें काय भर टाकली आहे ह्याचा साधारण तर्जुमा तिनें माझ्यापुढें माडला. मी तर काय ? नागासारखा

डोलतच होतों.

आमच्या आनदसमाधींतून आम्हांला ड्रायव्हरनें शिंग मोठमोठ्यानें वाजवून जागे केलें. भानावर येऊन पाहातो तों बाकीच्या सगळ्याजणी मोटरींत बसून कुजबुजत होत्या आणि गालांतल्या गालांत हसत आमच्याकडे पाहात होत्या मी खजील झालों; परंतु श्यामा हुकमती आवाजाने म्हणाली, " थांबा ग जरा आलेंच मी. "

" ए श्याम, चल ना ग लवकर माझ्या पोटांत कससंच होतय् " श्यामाला खिजवण्याकरता एक म्हणाली

" नि मला गडे क्लासला जायचय् " दुसरीनें तक्रार केली

" ऐक ग ! " श्यामेनें दटावले

" अग्ग बाई, खरंच कीं ! बाईसाहेब कॅप्टन आहेत आज. " एकीनें सूर ओढला आणि बाकीच्या खिदळल्या.

" बरं आहे. येतों मी. " कडवट तोंड करून पाय काढण्याच्या विचारानें मींच म्हटलें.

" बरं पण ओळख ठेवा आमची राहातां कुठें तुम्ही ? "

" कबुतरखाना " मी गडबडीनें म्हणालों, " आम्हालाच तुम्ही विसराल. एखाद वेळीं या ना आमच्या घरीं नाही तर तुमच्या घराचा पत्ता सांगा म्हणजे मीच येऊन तुम्हाला घरीं घेऊन जाईन आमच्या "

" अवश्य येईन मी. नाहीं तरी मला अलीकडे घरीं बसून चैनच पडत नाहीं. माझा पोपट गेला हो ! असा बोलका होता, काय सागू ? "

हरे राम ? तिनें पोपटाचें नांव काढलें आणि अस्मानाच्याजवळ गेलेला मी कोलमडत पृथ्वीवर येऊन आदळलों विद्याधरनें माझ्या घरांत आणून ठेवलेल्या त्या शुकमुनीची मला आठवण झाली. आनदाच्या भरांत मीं श्यामाला घरीं येण्याचें निमंत्रण दिले खरें परंतु त्या धर्ममार्तंडानें माझ्या घरांत श्यामाचें पाऊल ठरू दिलें असतें का ? नांव कशाला ? बोलणें, चालणें, गप्पागोष्टी, हसणे खिदळणे वगैरे सर्व प्रकार व्हायचेच आणि दर वेळीं जर त्या सोन्यानें एखाद्या चाबकाच्या फटकाऱ्यासारखी दटावणी दिली, तर काय कामाचें ? हे विचार चार पाच सेकंदांत माझ्या डोक्यांत येऊन गेले तो चाडाळ माझ्यावर पाहारा करीत असेपर्यंत श्यामानें माझ्या घरीं येण्यात कांहीं हशील नाहीं असे ठरवून मीं तिला सुचवलें, " बरं का ? मीं मघाशीं पत्ता सांगितला ना ? तिकडे आम्ही चार पाच दिवसानीं राहायला जाणार

आहोंत सध्या आम्ही दुसरीकडेच राहातों आमच्या नव्या बिन्हाडी गेलों म्हणजे मग मीच येईन आपल्याला घेऊन जायला आपला पत्ता देता ना ?"

" हो हो पण आपण आल पाहिजे ह आमच्याकडे; नाही तर उगीचच आपल..." ती एक सुदर व्हिजिटिंग कार्ड माझ्यापुढे करीत म्हणाली. थरथरणाऱ्या हातानीं तें कार्ड खिशात घालून मीं किंचित् हसत म्हटलें, " नाही नाहीं अस कस ? वा !"

तरुणाचें मन ही अशी काहीं चीज आहे, की तिला कोणतेच ठराविक नियम लागू नाहींत प्रेम आणि तरुणी हीं जोंपर्यंत त्याच्या मनात एकत्र आलीं नाहींत, तोंपर्यंत सारें गाडे सुरळीत असते, परतु ही जोडी एकसमयावच्छेदेंकरून जेव्हा त्याच्या मनांत ठाण मांडून बसते, तेव्हा ऋण आणि धन विद्युत असलेल्या दोन विजेच्या तारा एकत्र आणल्या असता जशी ठिणगी पडते तसें कांहींसे त्याच्या मनांत घडून येतें. मी कासावीस झालों होतों आणि घरीं आल्याबरोबर दार धाडदिशी बद करून त्या खाष्ट पोपटाला लाख शिव्या मोजण्याच्या बेतात होतों परंतु माझ्या बसायच्या खोलीत घडत असलेला अघटित प्रकार पाहाताच शिव्या देण्यासाठी मी पसरलेला आ आणखीच रुद झाला आणि मीं जागच्या जागीं क्षणभर खिळून गेलों !

सोन्याचा पिंजरा एका उच चौरगावर ठेवण्यात आला होता त्यावर हार, फुलें, हळद, कुकू वगैरे पूजासाहित्य वाहण्यात आलें होते कित्येक नुकत्याच लग्न झालेल्या आणि लग्नास झालेल्या तरुण स्त्रिया सोन्याला नीराजनें ओवाळीत होत्या. काहीं 'तांबव्या' बाया दूर उभ्या राहून गुरुदेवाची आरती म्हणण्यात तल्लीन झाल्या होत्या आमची आत्या त्याच्यातच माना डोलवीत आणि टाळ्या वाजवीत प्रफुल्ल चेहेरा करून उभी होती कोणी नैवेद्य अर्पण करीत होत्या, तर कोणी नाना तऱ्हेचे नवस सोन्याला पुन्हा पुन्हा बजावून सागत होत्या

आणि आमचे सोन्याजी ? त्याना कशाचीच दाद नव्हती ! नेहमीप्रमाणें आपली चोच पोटावर टेकून डोळे मिटून त्याची ब्रह्मनिद्रा अखड चालू होती. मध्येंच एखाद वेळीं त्याच्या लठ्ठ गळ्यातून चक्चक् असे आवाज बाहेर पडत आणि बाया ते कान टवकारून ऐकत हा धूमधडाका पाहिल्याबरोबर माझ्या तळपायाची आग मस्तकाला गेली समोर कोण आहे आणि कोण नाहीं ह्याची फिकीर न करतां दाणदाण पाय आपटीत मी इकडे तिकडे फिरू लागलों. दाराची फडाफड उघडझाप आरंभली. माझा रुद्रावतार पाहून जमलेल्या बायानी हळूहळू काढता पाय घेतला. शेवटीं खोली रिकामी झाल्यावर आत्यानें पिंजरा हलकेच उचलून नेहमींच्या ठिकाणीं अडकवून ठेवला.

आंतल्या आंत धुमसत राहिलेला अग्नि आतां माझ्या तोंडावाटे बाहेर पडूं लागला. मीं पोपटाला तडातड शिव्याची लाखोली मोजली. ती ऐकून आत्यानें सपशेल माझ्या तोंडावर हात ठेवला आणि ती गभीर स्वरानें म्हणाली, " ऐक बग्या, साधुसंतांबद्दल तोंडातून असे अमगळ शब्द काढू नयेत. "

" साधुसंत ? " मी गरजलों, " कोण साधुसत ? "

" हे आपले सोन्यामहाराज. खरोखर आदल्या जन्मींची पुण्याई म्हणून महाराजांचे पाय आपल्या घराला लागले ! " आत्याचे हे शब्द ऐकतांच त्या प्रकाराबद्दल माझ्या डोक्यांत प्रकाश पडला ; पण हसावे कीं रडावे तेच मला समजेना. मीं त्रासून विचारलें,

" म्हणतेस तरी काय आत्या ! अग, हा सोन्या; एक यकःश्चित् पोपट. तोदेखील दुसऱ्याचा. नि तो एकाएकीं महाराज कसा झाला ? "

" हो, झाला म्हणजे काय ? साक्षात्कारच होतो तसा शिवाचा हा अवतार आहे ! "

" कसला साक्षात्कार ? "

" तें नाहीं तुझ्यासारख्या टवाळाला समजायच. ती समाधि पाह्यलीस का त्याची ? सतत ध्यानमग्न. एखादा अमगळ कृत्य करू लागला किंवा करण्याविषयीं बोलला तर तेवढी आज्ञा व्हायची त्याची." असें म्हणून आत्यानें पिंजऱ्याला चक्क नमस्कार केला.

"कुणीं सांगितल हें तुला आत्या ? वेड तर नाहीं लागल ? "

" मीं ऐकलय त्यांना दोनदा आज्ञा करताना तुझ्या मित्रांनादेखील म्हणे त्यांनीं आज्ञा देऊन उपदेश केला अस शेजारच्या साळूताई म्हणत होत्या फार भाग्य बरं आपलं बग्या ! "

"खरं आहे ! " मी हताश होऊन म्हणालों. कोणाच्या कल्या आणि कोणाचें तिखटमीठ पडून दोन दिवसात तो प्राणी आमच्या आळींत ' सोन्यामहाराज ' म्हणून महशूर झाला त्याचें आश्चर्य करावें तितकें थोडेंच होते. आत्याला चहा करायला सागून मी [illegible] काढू लागलों. तितक्यात खिशांतून श्यामानें दिलेलें कार्ड खालीं पडलें तें पाहातांच मी क्षणभर सोन्यामहाराजाना विसरून गेलों. कार्ड हातात घेऊन आनदाने शीळ वाजवीत त्यावरील पत्ता पुन्हा पुन्हा वाचून काढला. होतां होतां रोमान्स माझ्या आंगांत संचरला आणि मी त्या कार्डाचें सरळ चुबन घेतलें ! इतक्यात वरून सोन्याजींची आज्ञा झाली,

"चू चू ! विठ्ठूमिया, काय करतो रे ?"

दोन दिवस झाले, विद्याधर आला नाहीं तीन गेले, चार गेले, होतां होतां आठवडा झाला तरी विद्याधरचा पत्ता नाहीं शेवटीं ठरवलें कीं आणखी दोन दिवस वाट पाहायची तेवढ्यात जर विद्याधर आपला पोपट न्यायला आला तर बरें नाहीं तर पोपटाची आपल्या मनाप्रमाणें स्वत विल्हेवाट लावायची कारण दररोज तीन प्रहरीं आमच्याकडे सोन्यामहाराजाच्या दर्शनासाठीं व पूजेअर्चेसाठीं येणाऱ्या बायाबापड्यांची संख्या वाढत चालली. बायाच्या झुडी पाहिल्याबरोबर म्हातारेकोतारे थोडेच दूर राहाणार आहेत. तेही मधूनमधून आमच्या घरात डोकावू लागले. साराश काय, हा उच्छाद एकदाचा केव्हा सपतो असें मला होऊन गेलें.

असेच आणखी दोन दिवस गेल्यावर विद्याधरचें पत्र आलें मोठ्या उल्हासानें तें गुलाबी पाकीट फोडून वाचायला घेतलें तों काय ? एक कुंकुमपत्रिका निघाली. विद्याधरचा विवाह आणि रा ब धडपड्याच्या कुसुमशीं होणार ? आणि दोघेंही आमच्या गांवातलीं असून लग्न मात्र साताऱ्याला व्हायचें होते ! हें आहे तरी काय ? लग्न उरकल्याशिवाय विद्याधर परत येणें शक्य नव्हतें आणि तोंपर्यंत त्या भयकर प्राण्याची माझ्या गळयाला बाधलेली धोंडही सुटणें शक्य नव्हते. कदाचित् मीं इतकेंही सहन केलें असतें परंतु पत्रिकेच्या मागल्या बाजूला विद्याधरनें मला जो खाजगी मजकूर लिहिला होता त्यानें कमाल केली :—

"चि बगूनाना ह्यास, अनेक आशीर्वाद वि. वि

ठरल्याप्रमाणें मी पोपट परत घ्यावयास चार दिवसांनीं यावयाचा परंतु माझें ह्या गावीं विवाहाचें जमल्यामुळें तूर्त येणें अशक्य आहे. शिवाय आता आपलें असें माणूस घरात आल्यावर पोपटाकडे लक्ष देण्यास कोठून फावणार ? म्हणून आमच्या विवाहाची देणगी म्हणून माझा लाडका सोन्याच तुला बहाल करण्याचें ठरविलें आहे. माझ्यापेक्षांही तू त्याची बडदास्त अधिक दक्षतेनें ठेवशील अशी मला खात्री आहे. कारण एक तर तुला पोपटाचा अतोनात छद आहे आणि शिवाय तुला घरांत वेळ मोडणारें असें कोणी नसल्यामुळें पोपटाकडे लक्ष देण्यास तुला कांहीं [illegible]ण नाहीं. बहुत काय लिहिणें ?

आपला,

विद्याधर पंडित"

पत्र वाचून होताच मीं ताडकन् कपाळावर हात मारून घेतला ! त्या खळ्याळ

प्राण्याची घोरपड खुशाल माझ्या गळ्यांत अडकवून विद्याधर आपला मोकळा झाला होता. ह्या संन्याशानें ही कुसुम पाहिली केव्हा, पसत केली केव्हां, आणि त्यांचें जमलें तरी कसे आणि कोठें, ह्याचें मला राहूनराहून नवल वाटलें आणि मी ? मोठ्या प्रयासानें नुसता कोठे जरा श्यामा बामशीं परिचय करून घेतला आणि आतां कोठें जरा आमच्या घरात प्रेमाचे फूल उमलू लागणार तों मध्ये हा सोन्या आडवा आला. इतके दिवस आशा तरी होती, कीं जाईल आल्या पावलीं निघून पण छे! पाहुणा म्हणून बेटा घरात शिरला आणि आतां कायमचा यजमान होऊन बसणार! हरे राम!

जरा वेळानें आत्या खुषींत आहे असें पाहून मी तिला म्हणालों, "बर का आत्या, विद्याधरच लग्न ठरलय् पत्र आलय् त्याच"

"ठरल का एकदाच ? कुणाशी ते ?"

"रावबहादुर धडपड्यांची कुसुम"

"अरे माझ्या कर्मा!"

"का ग ?" मी आश्चर्यानें विचारलें

"म्हणजे ? तुझ्या नाहीं का कानावर ? साऱ्या गांवांत बोभाटा झालाय् त्याचा"

"कशाचा आत्या ?"

"अरे, ह्या दोघांनीं आरभलीं होतीं ना एकेक थेरं ?"

"थेर ? नि तीं कुणीं ?"

"हा तुझा विद्याधर नि ती कुसुम धडपड्यांची!"

"मग ? त्यांनीं काय थेर केलीं ?"

"गळ्यांत गळा घालून रस्त्यावरन मिरवायच तेवढ बाकी ठेवल होत त्यांनीं!"

"म्हणजे ?"

"त्याच्या कधींपासन झाल्या आहेत गांठीभेटी, सुरू आईबापांना पत्ता नाहीं! परस्पर आपल जमवल दोघानीं नि परवां तिनें म्हणे आपल्या बापाला चक्क सांगितल, माझ्याकरतां स्थळ पाहू नका म्हणून! बाप लागला आड यायला, तेव्हां म्हणे गेली [illegible]ऱ्याला पळून त्या पोराबरोबर. तिथनच बापाला लग्नाच ठरल म्हणून कळवून [illegible]लन्! कलियुग बरं हें, कलियुग बाबा! नाचाल तेवढ थोड आहे!"

आत्यानें सांगितलेली हकीगत ऐकून मी मात्र दिङ्मूढ झालों ह्या गोष्टीची मला गंधवार्ताही नव्हती, इतकेंच काय, पण माझ्या ताज्या बातमीदार मित्रापैकीदेखील जीबद्दल माझ्याजवळ कोणीं बोलला नाहीं, ती आमच्या आत्याला इतकी इत्थंभूत

कशी समजली ह्याचें मला फार नवल वाटलें. आत्याच्या मैत्रिणींचें प्रसिद्धिखातें इतकें चलाख असेल ह्याची मला कल्पना नव्हती शिवाय आमचा विद्याधरसारखा महर्षि असलें कांहीं अद्भुत धाडस करील हे एरव्हीं मला कोणीं सांगितलें असते तर खोटें वाटलें असतें. पण विद्याधर झाला तरी माणूसच की नाही ? आणि त्यांतून आपल्या वयांत आलेला. त्याच्याही मनात केव्हा तरी असली ठिणगी ही पडायचीच पण त्या चांडाळ पोपटाला माझ्या गळ्यांत अडकवून जाण्यात काय साधलें बेट्यानें ? माझ्या वाटेत तो फव्या निवडुग टाकून देऊन आपण खुशाल मजा करण्यासाठीं साताऱ्याला पोबारा केलान् ! मला राग आला मनातल्या मनांत विद्याधरवर दांत ओठ खाऊन मीं सूड उगवण्याचे ठरवलें आणि आत्याला म्हणालों,

" एकूण काय आत्या, उद्या ह्या पोपटाची कुठे तरी सोय लावली पाहिजे "

" कुणाची ?—महाराजाची ? ती कां ? "

" त्याच असं झालय् की विद्याधरने तो पोपट मला त्याच्या लग्नानिमित्त आंदण म्हणुन दिला आहे. तेव्हा आता त्याची विल्हेवाट लावायला आपल्याला कांहींच हरकत नाहीं. "

" इश्श ! असल अभद्र बोलू नकोस बाई बग्या..."

" अभद्र कसल ? नाहीं तरी आपल्या घराला धार्जिणे नव्हेतच हे प्राणी, तेव्हां उगीच त्याची हत्या होण्यापेक्षा. ."

" चूप ! भलतच काहीं तरी बोलत सुटला आहेस. अरे महाराज ईश्वरी आहेत. त्यांना का आपल घर बाधणार आहे ? उलट त्यांचा सहवास आपल्याला नेहमीं मिळावा अशी आपण इच्छा केली पाहिजे. "

" आतां तुला काय म्हणाव आत्या ? अग हा फाटका पोपट नि ईश्वरी अश कशाचा आलाय् ? उगीच कांही तरी कल्पना काढायच्या त्या ! "

" ते नाहीं मला तुझ्यासारख्या चावटाला सागतां यायच पण सांगून ठेवतें, तू हात तर लाव महाराजाना, कीं मी पाण्याच्या थेंबाला शिवायची नाहीं तुझ्या घरातल्या ! " आत्याने अल्टिमेटम् दिला मी मनांतल्या मनात जळफळत बसलों. नव्या नवसाची आमची श्यामासारख्या सुदर विदुषीबरोबर ओळख झालेली, लवकरच ओळखींतून प्रेमाचा अकुर फोफावण्याचीं शुभ लक्षणें दिसू लागलेली; आणि अशा वेळी साऱ्या आनदाचें मातेरें झालेलें! विद्याधरनें आपली प्रेमाची मोहीम फत्ते केली. आणि आम्ही ? खूप गाजावाजा करून शेवटीं ह्या खव्याळ

पोपटामुळें मनगटें चावीत बसलों !

दुसरा दिवस बुधवार होता. हातांत एका साप्ताहिकाचा अंक घेऊन त्यांतील आठवड्याचें भविष्य पाहात खोलींत विषण्ण चित्तानें बसलों होतों. माझ्या राशीचें त्या जोतिष्यानें वर्तवलेलें भविष्य वाचून माझें मलाच हसू आलें त्या बेट्यानें लिहिलें होतें, "या बच्चजी टाळी ह्या आठवड्यात तुमचे ग्रह असे पॉवरफुल आहेत, कीं मनांत आणाल तें होईल हसू नका असे! अहो, ग्रह आहेत का मस्करी आहे? प्रत्येक कार्यांत यश, स्त्रीसौख्य भरपूर, चिंतानाश, शुभ कृत्यें इत्यादि इत्यादि "

तें रामभरोसे भविष्य पाहून त्याच्या पोटभरूपणाची मी कींव करू लागलों. माझ्या राशीला म्हणे ग्रह जोरदार आहेत! आहेत खरेच! म्हणून तर सारखे मला उलटा पालटा करताहेत. सराइत बोलर सारख्या दाब्या उडवताहेत सगळया आकांक्षा खलास झाल्या जिकडूनतिकडून सहारा झाला, तरी हा आपला म्हणतोच आहे, स्त्रीसौख्य भरपूर हात् गाढवा! लिहितोस काय ह्याची तरी कल्पना आहे तुला? अरेरे, श्यामा, माझी प्रेमलता, माझा कुतुबमिनार, माझी अनारकली...

मी आणखी बहकलों असतों पण इतक्यात वरून सोन्या किंचाळला,

"च् च्! विठूमिया, काय करतो रे?"

"थांब लेका" मी संतापून म्हणालों, "दाखवतोंच तुला काय करतों तें! ..." आणि खरोखरीच त्वेषानें उठलों. परंतु इतक्यांत कोणीं तरी दारावर टिचकी मारली. मला आपलें अवसान आवरावें लागलें आणि दार उघडल्यावर जेव्हा आलेली व्यक्ति दृष्टीस पडली, तेव्हां तर तें अजिबात गळून गेलें. हातात कसलें तरी बाड घेतलेलें, घामानें डवरलेला चेहेरा, तो हातरुमालानें पुशीत तोंडावर हास्य चमकावलेलें, आणि मला जणू काय चकित करण्यासाठी आपण आलों असें दर्शविण्याचा प्रयत्न चाललेला, अशी श्यामाची सुंदर प्रतिमा जिन्याच्या तळकटात उभी होती. "या या, आत या!" मी उसनें हास्य तोंडावर फुलवीत म्हणालों आणि लगबग करून बसायला खुर्ची दिली. जिच्या कल्पनेनें जीव इतके दिवस व्याकळून गेला होता, तीच आपल्या पायांनीं माझ्या घरीं चालून आली हें पाहून मन एकीकडे सिंगलबार-डबलबार करायला लागलें, तर एकीकडे त्या चांडाळ सोन्याचीं मुक्ताफळें अचानक बाहेर पडून आमच्या आनंदाचा ओंफस केव्हां होईल ह्याचा धसका मनाला धक्के देऊं लागला. शिवाय अशी ब्यूटी एखाद्या उल्केप्रमाणें अचानकपणें आपल्या पुढ्यांत येऊन उभी राहिल्यावर माझ्यासारख्या तरुणाला गांगरल्यासारखें व्हायचेंच. अहो,

.खरूं लांबून फार मोहक दिसतें. पण तेंच जर का एकदम येऊन [illegible], जीव कासावीस झाल्यावाचून कसा राहील? माझें तसेंच झालें. [illegible] भांबावून गेलों.

" इतक्या लवकर आपण आम्हांला विसराल असं वाटल नव्हत " ती [illegible] रागानें म्हणाली.

" छे, छेः विसरेन कसा मी? आज-उद्यां इतक्यांत येणारच होतों. पण आमच्या आत्याचे जरा साधे धरले होते. त्यामुळे जमलच नाहीं " मी साफसफाई केली

" आपली वाट पाहून दमलें नि आज शेवटीं विचार केला, कीं आपणच जावं नि काय आहे तें पाहाव. शिवाय कामही होतं थोडसं तुमच्याकडे. "

" असं का? अवश्य करू आपण. मागच का नाहीं सांगितलत? " मीं उल्हासानें विचारलें, कारण कोणत्याही तरुणाची आपल्या जिवलग मैत्रिणीच्या बाबतींत एकच बलवत्तर इच्छा असते ती हीच, कीं 'तिचें' काम निघावे आणि ते आपल्या हातून पार पडावें. तेव्हां आपण होऊन तिनें काम काढल्याबरोबर मला पोटातून गुदगुल्या होऊं लागल्यास नवल काय?

" अगोदर कस सांगणार? " तिनें हातांतील बाड टेबलावर उताणें करीत म्हटलें, " हें लिहून झालं होत कुठें तेव्हां? "

" म्हणजे? लिखाण आहे वाटत काहीं? " माझा उल्हास किंचित् ओसरला.

" हें नाटक लिहिलय् मीं! नि किती दिवसांत ठाऊक आहे का? सारे तीन दिवस.. "

" ह, समजलों " माझ्या जन्मस्वभावाप्रमाणें तिच्या म्हणण्याचा निराळाच अर्थ मनांत घेऊन मीं जीभ सैल सोडली, पण लगेच चावलीही. कारण तिनें रागानें माझ्याकडे पाहिलें आणि माझें लक्षही चटकन् सोन्याजींच्या पिंजऱ्याकडे गेलें. ती पुढें म्हणाली, " माझ्या जिव्हाळ्याचा विषय मिळाला. मग काय? कल्पनाच कल्पना. भराभर विचार येऊ लागले डोक्यांत नि काढल त्या सपाट्यांत लिहून. म्हटलं तुम्हांला एकदा वाचून दाखवाव नि मग घ्यावं फेअर करायला. "

" कसच कसच? " मीं एक फक्कड हास्य तोंडावर चमकावीत म्हटलें, " उगीच मोठेपणा देताहांत झाल मला. मला हो काय समजतय् त्यांत? "

" वा! त्यातच तर खुबी आहे. लेखकाला वाचून दाखवायला लागलं, म्हणजे त्याचा स्वतःचाच शहाणपणा सुरू होतो. नाटकांतल स्वारस्य कळून यायचं राहातं

च् च्! विठूमिया काय करतो रे!

कल्पनेचं, पण खोडाखोडी मात्र विलक्षण होते तेव्हां म्हटल, तुमच्या रसिकतेनं त्यातली खरी गोडी कळेल तुम्हाला तें आवडल, म्हणजे देऊ कुठे बसवायला, नाहीं तर राहील पडून तसच मी नाही ग बाई माझ लिखाण भलत्या लोकांच्या गळ्यात बाधायची!"

"तें दिसतच आहे बरं कशावर लिहिल आहे नाटक?"

"दरोडा बिलावर!"

"अस्स!" मी गळ्याचें बटन मोकळें करून म्हणालों

"नाटकाला नाव दिलयू . बायकाचे वारस .."

"वा! नाव तर झक्क आहे बुवा"

"नावात काय आहे म्हणा? ह! आता लक्ष लावून ऐकायच गडे" वाचण्याच्या तयारीनें म्हणाली. तिचा तो लाडिक आर्जवी स्वर, मानेची लचक आणि तें "गडे" ऐकल्यावर आमची स्वारी गगनात भराऱ्या मारू लागली आणि तिच्या मनोहर चेहेऱ्याकडे लक्ष लावून म्हणाली,

"मला किनई, दुसऱ्याने वाचून नाहीं मजा लागत नाटकांतली. माझ मी जेव्हां एकान्तात वाचीन, तेव्हा कळेल त्यातली गोडी. म्हणून म्हणतो ठेवून जा उद्यापर्यंत वाचून ठेवीन"

"इश्श!" ती मानेला एक लपकन हिसका देऊन म्हणाली,"तस मनाशी वाचून का कुठे नाटकातल स्वारस्य कळत?"

तिच्या त्या 'इश्श'नें तर कमालच केली. मी कोठे आहे आणि काय करीत आहे याची जाणीव नाहीशी झाली हाताच्या बाह्या वर सारीत बडबडलों, "बर आहे ऐका! तुम्ही वाचा ते पण कोणतही कार्य करायला आरंभ करण्यापूर्वी तोंड गोड करावं म्हणतात. तेव्हां..". परतु तत्क्षणीं कोपऱ्यातून . . . आज्ञा सुटल "चू चू! विठूमिया, काय करतो रे?"

माझे हात एकदम गळून खालीं पडले आगाला दरदरून घाम सुटला रुमालानं कपाळ पुशीत एखाद्या चोरट्यामारखा एवढेसें तोंड करून पाहू लागलों पण श्यामाने पोपटाचे शब्द ऐकतांच ती एकदम तरारली आणि आनदाने टाळ्या वाजवीत खुर्चीवरून उठून म्हणाली, "अग बाई, सोन्याच वाटत? हो तोच. सापडला ग बाई एकदाचा!"

"सोन्या?" मी हतबुद्ध होऊन उद्गारलों